९३०३।||= मुलाम्यास खाों सोनें वजन तोले ३३२।||·।| दर १९।||≡ प्राों रु.

---

No. 197]

६९९ देणे मजुरी कारीगार यास

३२६ देणे वर्खवाला यास वर्खाची घडाई सोनें वजन तोले ३२६ दर तोल्यास रु. १ प्रमाणें रु.

३२६ देणे मुलामगार दर तोला रुपया १ प्रमाणें रु.

३ देणे तांबटास कलस चढवितेसमई आा १२ येकून येक रोजा रु.

७१ हऊद आभिशेकपात्राचा तांब्याचा १ केला त्यास.

६४ हऊद वजन पके ८||९||९ दर सेरी रु. २|| प्रो रु.

७ मलसूत्र पितलीचे वजन पके ८८२ दर सेरी रु. ३|| प्रमाणें.

---

७१

---

No. 198] [18-2-1768

छ २८ रमजान

खालील जिन्नस जिनसखान्यांत जमा झाले :—

(१) ३८ रुपये किंमतीच्या, घड्यालांच्या कमाणा १३.

(२) २४ भिंगे घड्यालांची, किंमत रु. १२.

---

No. 199] [20-3-1768—18-4-1768

माहे जिलकाद सुाा समान सितैन मया व अलफ

पेशव्याची रोजकीर्द

[21-3-1768

छ २

राजश्री राव यांजकडे उपनेत्रें भेटीचीं आलीं तीं बांधावयासी रुमाल खादीचा १.

2522

[22-3-1768

छ ३.

वैद्यखान्याकडे चार लहान कातड्याच्या बुधल्या २ रुपयांस विकत घेतल्या.

बालाजी नरहर, पंतोजी निा नाटकशाला, यास सन संमानचे मोइनीचे कापड

[1-4-1768

छ १३

जिराइतखान्याकडे जानोजी सिंदे व आपाजी बहिरट यांचे तां बंदुखा आहेत व पिस्तोले आहेत.

---

No. 200] [3-4-1768

छ १५

खाशाकडील घड्यालास ५ आणे किंमतीची कांच वसविली.

[7-4-1768

छ १९

सौभाग्यवती रमाबाई यांचेकरितां पितळी मुठीचे दोन चाकू १० आण्यास विकत घेतले.

[8-4-1768

छ २०

पुण्यांतील, सयद सादत व शेख सला, ह्या दोन पिराना इमारत बांधण्याकरितां १४०० रुपयांची देणगी देण्यांत आली.

[10-4-1768

छ २२

पुण्याची हुंडी बनारसमध्यें शेकडा ८ हुंडणावळ घेऊन पटविली जात असे.

---

No. 201] [13-4-1768

छ २५

शेख हुसेन यानें मेणाचे केलेले एक फुलझाड पेशव्यास नजर केले. ह्याबद्दल पेशव्यानें त्यास एक तिवट बक्षिस दिलें.

[17-4-1768

छ २९

बाबत हाफिनुदि(न) सुरतकर याणी मीरकासम वकील याजबा दागिने पाठविले:—

१ बंदूख चापाची बतीस बाराची साधी, कट इंग्रजी तांबे.

३, तांब इंग्रेज करून मराठे गाडदी दिंमत जानोजी सिंदे यास कवाईत करावयास ठेविला आहे सा। टोपी फिरंगाणी खा। करून दिल्ही त्याची किंमत रसानगी यादी रु.

---

*No. 202]* *[25-9-1767—24-10-1767*

माहे जमादिलावल सु॥ समान सितैन मया व अलफ

दादासाहेबांची रोजकीर्द

परगणे त्रिंबक येथील न्हाव्यांवरील वार्षिक कर ४० रुपये करार करण्यांत आला.

दादासाहेबानीं आनंदवल्लीस तोफांचे गोळे तयार करण्याचा नवीन करखाना सुरू केला. अशाच प्रकारचा कारखाना पूर्वी नागोठण्यांस होता.

आनंदगीर गोसावी यानें एका कलावंतिणीस बळजबरीनें आपल्या घरांत ठेविली म्हणून त्यास १५०० रु. दंड करण्यांत आला.

---

*No. 203]* *[25-9-1767—24-10-1767*

माहे जमादिलावल सु॥ समान सितैन मया व अलफ

दादासाहेबांची रोजकीर्द

दादासाहेबांच्या दोन पुस्तकशाला होत्या; एक आनंदवल्लीस व एक त्र्यंबकेश्वरीं.

शस्त्रवइद्य यांचा अर्ध्या महिन्याचा पगार:—

रु. ११।· बडेखान.

रु. ११।· राजे महमद.

रु. ९ राजे मलिक.

रु. ७॥· साहेबखान.

No. 204]

तुकोजी होळकराकडून परत येणारे दोन जासूद वाटेंत लुटले गेले. त्या जासुदांना नुकसानभरपाई म्हणून ८ रु. देण्यांत आले.

सातान्यास छत्रपतींकडे पुण्याहून एक वाघ पाठविला. वाटेनें त्या वाघास दररोज तीन शेर मांस देण्यांत येत होतें. मांसाचा भाव, एक रुपयास ६ शेर.

आनंदराव गिरिधर हा पेशव्याचा वकील म्हणून कोल्हापुरास जिजाबाईजवळ राहात होता.

७९।॰ रु. किंमतीची सनगें झगे चुणणान्यास, त्याची वार्षिक नेमणूक म्हणून, देण्यांत आलीं.

१९ रु. किंमतीची वस्त्रें पुण्यांतील दोन पिरांकडून पेशव्यास आशीर्वादादाखल आलीं.

---

No. 205]

गंगाधर येसवंत याणी कोा पुणें येथें खरिदी घोडी रास येक येकूण किंमत रु. ३००० तीन हजारास केली आहे. त्यास, जकातीचा हासील मारनिले यास येक साला माफ केला असे. तरी सदरहू किमतीचा हासील होईल तो मारनिलेचे नांवे माफखर्च लेहून हासिलाचा तगादा न करणें.

काशी येथील ब्राम्हणांच्या वार्षिक दक्षणेकरितां १३५०० रुपयांची रक्कम मंजूर करण्यांत आली.

माहादाजी मुदगल याणें खोटे सिके केले सा त्यास दौलताबादचे किल्यांत कैदेंत ठेवण्यांत आले.

---

No. 206]

बाज पक्षाचा दररोजचा खुराक: मांस अर्धा शेर.

बहिरी पक्षाचा दररोजचा खुराक: मांस अर्धा शेर.

बसेरा पक्षाचा दररोजचा खुराक : मांस ९ टाक.

---

No. 207] [27-12-1767—21-1-1768

माहे साबान सुा समान सितैन मया व अलफ

दादासाहेबांची रोजकीर्द

छ ९

टीकेसहित योगवासिष्ट या ग्रंथाची बरोबर नक्कल करण्याचे कामाबद्दल एका ब्राम्हणांस ४०० रुपये करार करण्यांत आले.

[28-12-1767

छ ६

दादासाहेबांकडील एक खंजीर त्यांच्या एका खिजमतगारानें हरविला. त्या खंजिराची किंमत म्हणून त्या खिजमतगाराकडून ३० रु. घेण्यांत आले.

[30-12-1767

छ ८

बाजी गणेश याच्या देखरेखीखालीं असलेल्या बागांकरितां रु. ६२५-२-९ मंजूर करण्यांत आले.

रु. ४॥ ते ६, माळ्याचा मासिक रोजमरा.

---

No. 208] [4-1-1768

छ १३

नाटकशालांच्या मासिक खर्चाकरितां रु. ७२१-१३-६ मंजूर करण्यांत आले.

[5-1-1768

छ १४

हुजूर दप्तराकडील कारकुनानीं कांहीं लिहिण्याचें काम विशेष जलदीनें करून दिले. ह्याबद्दल त्याना त्यांच्या नेहमीच्या पगाराशिवाय निराळे बक्षिस देण्यांत आलें.

[8-1-1768

छ १७

मुंबईकर इंग्रजांकडून खालील जिन्नस नजर आले:—

(१) चार लहान कुप्यांत तीन तोळे विलायती अत्तर
(२) आरसा मलमुत्री दुहिरी
(३) चित्रे दर्याची, २४
(४) चांदीची गाय, किंमत रु. ११-८
(५) सोन्याची साखळी, वजन तोळे १२॥, किंमत रु. १८७-८

---

No. 209] [9-1-1768

छ १८

यात्रेनिमित्त झालेल्या कर्जातून मुक्त करण्याकरितां त्रिंबकराव विश्वनाथ (पेठे) यांस २५००० रु. बक्षिस देण्याचा हुकूम करण्यांत आला.

No. 210] [12-1-1768

छ २१

जमा जिनसखाना :—

खरेदी सूर्यघड्यालें गुा यादो विठल कोर्डा शागीर्द किंमत रु. १५० येकून दागिना किलीसमेत सुमार १.

[14-1-1768

छ २३

नवीन जंबुरे तयार करण्याकरितां ३०० रु. मंजूर करण्यांत आले.

[16-1-1768

छ २५

मुंबईच्या चार्लस् ब्रूम (ब्रुक?) नांवाच्या इंग्रज वकिलांस निरोप देतेसमयीं ५०० रु. देण्यांत आले.

[20-1-1768

छ २९

कलकत्तेकर इंग्रजानीं दादासाहेबांस दोन काचेचे हुक्के नजर पाठविले.

---

No. 211] [23-12-1767—21-1-1768

माहे साबान सुा समान सितैन मया व अलफ

दादासाहेबांची रोजकीर्द

[8-1-1768

छ १७

जमा जिरायतखाना :—

१ बंदूख, नलीवर शाहाता व दस्त्यास निशाण रुपेरी.

२ पिस्तुलें, यास जबडे सिंव्हाचे रुपेरी मलसुत्री.

१ कमची तातीची चर्मी.

---

No. 212] [10-1-1768

छ १९

रु. ६, १०० भांड्यांस कल्हई लावण्याबद्दल.

[12-1-1768

छ २१

घोड्याची लाथ लागून जखमी झाल्याबद्दल एका नोकरांस ४ रुपये देण्यांत आले.

No. 213] [22-1-1768—19-2-1768

माहे रमजान सुा समान सितैन मया व अलफ.

दादासाहेबांची रोजकीर्द

दादासाहेबाकडील हत्तींचीं नांवें :—

उत्तमगज, विनायकगज, गजराज, मुलाइमगज, करीमबक्ष, रांबाण, गणेशगज, भवानी, बक्याहती, महबूबगज, बहादरगज, नबीबक्ष, गजघंटा, राजबागीण, लक्ष्मीसीमधार.

---

No. 214] [22-1-1768—19-2-1768

[31-1-1768

माहे रमजान सुा समान सितैन मया व अलफ

छ १०

पुण्यांतील बागेंत लावण्याकरितां औरंगाबादेहून ७५ रुपयांस २५ सरूंची झाडें आणविण्यांत आली.

[2-2-1768

छ १२

छ ११ रोजीं नाना फडणिसानी पेशव्यांस बागेंत मेजवानी केली. त्यासमयीं त्यानीं पेशव्यांस ७०५ रु. ५ आणे किंमतीचा एक सोन्याचा चौफुला नजर केला. ह्या चौफुल्याचा आकार चार आंब्यांच्या घडासारखा होता.

एक घोडा फार खराब झाला होता. म्हणून त्यास तुपाउडदाचा खुराक सुरू करण्यांत आला.

[5-2-1768

छ १५

बाजेखर्च राजश्री नारायेणराव याजकडील हातघड्यालास लावावयासी ताा जिवाजी काटकर खिजमतगार तेल चमेली वजन पके ८८८१.

---

No. 215] [6-2-1768

छ १६

खाशाच्या पलंगास लावावयासी तेल मोगरेल वजन ४॥ तोले.

2528

[7-2-1768

छ १७.

गोपिकाबाई यांजकडील घड्याल नादुरुस्त झाल्यामुळें गोपालजी कारीगर याजकडे पाठविण्यांत आले.

द्वारकाबाई, पार्वतीबाईची आई.

लक्ष्मीबाई, पार्वतीबाईच्या भावाची बायको.

गौतमाबाई, पार्वतीबाईची मामी.

ठमाबाई
ठकूबाई
आनंदीबाई
बयाबाई
} पार्वतीबाईच्या बहिणी.

सात बिनवेजाची लहान मोतीं, देवीवरील औषध बनविण्याकरितां, एका गृहस्थाला देण्यांत आली.

---

*No. 216*] [*13-2-1768*

छ २३.

राजश्री रावसाहेब यांजकडील गंजाचे घड्याल.

[*18-2-1768*

छ २८.

गोपिकाबाईकरितां एक वालुकायंत्र तीन रुपयांस खरिदी करण्यांत आलें.

---

*No. 217*]

बाजेखर्च राजश्री नारायेणराव यांजकडील हातघड्यालाचे झाकण मखमलीने मढून दिल्हे. बेत गुा रघोजी जिनगर दिा पागा हुजूर ताा जिवाजी काटकर खिजमतगार मखमल तसू ८१ योा दर ३० प्रमाणे आख १।

महमद इसफ गाडदी यांस पालखीचा मान होता.

---

*No. 218*] [*20-3-1768—18-4-1768*

[*4-4-1768*

छ १६

माहे जिलकाद सुाा समान सितैन मया व अलफ

दादासाहेबांची रोजकीर्द

दादासाहेबांची स्वारी सवदगांवी गेली असतां तेथील पाटील त्यांस सामोरे आले नाहींत. ह्या अपराधाबद्दल त्या पाटलांस ५ रु. दंड करण्यांत आला.

2529

[15-4-1768

छ २७.

आबाजी महादेव व चिंतो विठ्ठल यांस कांहीं बिघे जमीन बागाईत करण्याकरितां देण्यांत आली व असेंहि फर्मावण्यांत आले कीं, पुढें ह्या जमिनीवर जिराईत जमिनीवरील साऱ्याच्या चालू दरानेंच सारा घेण्यांत यावा.

---

## ITEM No. 13 : 1772-1773

No. 219]

[10-5-1772

१० सफर

आपाजी रामाची बायको सती गेली

[12-5-1772

८ सफर

वसंतपूजेनिमित्त ब्राह्मणास दक्षणा दिली.

हजर असलेल्यांचीं नांवें.

बालकृष्णशास्त्री

| | |
|---|---|
| रामशास्त्री | गंगाधर सुबराव |
| कृष्णशास्त्री | गोपालशास्त्री |
| आपाशास्त्री | लक्ष्मण पाठक |
| आनंदकर मिस्र | बापू पाठक. |
| कासीनाथशास्त्री | महादेवशास्त्री |

[25-5-1772

२१ सफर

कृष्णराव जगन्नाथ पेशव्याचा अर्काटकडील वकील. यासी बहुमानाचीं वस्त्रें.

[27-5-1772

२३ सफर

मेहता मोहकिमसिंग जोधपूरचा वकील, यासी बहुमानाचीं वस्त्रें २९०

[8-6-1772

६ रबिलोवल

गडगनेर खर्च विश्वासराव त्रिंबक पेठे यांचे पुत्राचे लग्न आहे सबब
तिवट जाफरखानी.

¶*The entries for the year 1772-73 are also highly important, as it was in this period that the Peshwa Narayanrao was murdered.*

---

*No. 220*] [*10-6-1772*

८ रबिलावल सल्लास सबैन

कृष्णाजी विश्वनाथ याचे नावे सनद की माणकजी मोधी सुरत दिा काप्रोजी इंग्रज याचे तराडे बनाम रुपारेल आजणवेली तालुक्यात मालसुधा अटकाविले आहे. त्यास तरांड्यातील माल अमानत ठेवणे. मालाची तहकीकात झाल्यावरी जाबस्वाल करणे तो केला जाईल. तूर्त फक्त तरांडे कठडा मात्र अकटा अवंदा दोन डोल परबान सिडे तोफा वगैरे सरंजाम नवे जुने रसे असतील त्यासुधा माघारे देविले असे. तरी सदरहू लिहिल्याप्रमाणे सरंजामसुधा तरांडे माघारे देऊन कबज घेणे म्हणौन सनद.

[*14-6-1772*

१२ रबिलोवल

भिकोबा वैद्य, वार्षिक तनखा १००० रु.

[*17-6-1772*

१५ रबिलोवल

कासी त्रिंबक यासी खालीं दिलेल्या किल्यावरी सामुग्रीची तपासणी करण्याकरितां पाठविले.

| | |
|---|---|
| लोहगड | घनगड |
| सरसगड | राजमाची |
| विसापूर | प्रतापगड |
| मिरगड | चन्दनगड |

[*20-6-1772*

१८ रबिलोवल

नानासाहेबांच्या पुण्यतिथीचा खर्च १३१८

[1-7-1772

२९ रबिलोवल

जानोजी भोसले याचेकडे बाळापूर परगणा देण्यांत आला. परंतु लवकरच सनदापत्रावर सह्या होण्यापूर्वीच जानोजी मरण पावला. तो प्रांत मुधोजी भोसले याजकडे देण्यात आला.

---

No. 221] [6-7-1772

४ रबिलाखर सल्लास सबैन

तोतया सुखनिधान दौलताबादेस होता. किल्ल्यावरील महादजी दादाजी चव्हाणाशी त्याचे सूत जमले या संशयावरून त्याची रवानगी पुरंदरला करण्यांत आली.

[12-7-1772

१० रबिलाखर

चिकोडीचा तावनापा नाईक हैदरला मिळण्याकरिता जात असतां पकडला गेला. ५००० रु. दंड घेऊन त्याला सोडण्यांत आलें.

[14-7-1772

१२ रबिलाखर

राजेश्वर वैद्य यास १५० रु. दरमाहा वेतन

[22-7-1772

२० रबिलाखर

राणोजी सलगर याच्या पथकास आपाजी सदासिव व लक्ष्मण पांडुरंग यांची फडणीस व मुजुमदार अशी नेमणूक केली होती. राणोजी सलगर व फडणीस-मुजुमदारांचे पटेना म्हणून त्यांस कामावर न येण्यासंबंधीं त्यानें फर्माविले. सरकारांत हे कळल्याबरोबर राणोजी सलगर यास त्यांकडून पूर्ववत काम घेण्यासंबधी हुकूम देण्यांत आला.

[27-7-1772

२५ रबिलाखर

लक्ष्मण नारायण वैद्य यास आरण्यकांड व अयोध्याकांड यांतील १३४३२ श्लोक नकल करण्याबदल रु. ६७.

No. 222]

[9-8-1772

१ जमादिलावल

मोरो बापूजी फडके याची सुवर्णदुर्ग तालुका किले सुभा—नेमणूक

[4-10-1772

६ रजब

बाा देणे ताा आपाजी हरी याजकडे रायगड येथील मोर्चेबंदीबद्दल रसानगी यादी सामान

काथा वलीव

लोखंडी दागिने

| | |
|---|---|
| कुदली | कुराडी |
| पावडी | कोइते |
| पाहरा | चंद्रज्योती |

---

No. 223] [7-10-1772

सलास सबैन

९ रजब

बनेश्वरच्या देवळाच्या खर्चाकडे ४६१ रु. मंजूर केले असेत.

[8-10-1772

१० रजब

सुरापूरचे पामनाईक व पीडनाईक याजकडून खंडणी ८५००१

[9-10-1772

११ रजब

पाहुण्यानिमित रसानगी खर्च :

४२–८–० जिऊबाई गोडबोले, पार्वतीबाईची मावशी

[10-10-1772

१२ रजब

कापड ३८-१०-०, गोपिकाबाई, सगुणाबाईची भावजय

[2-9-1772

४ जमादिलाखर

पुण्यांत खाटकाने गाय मारली. कोतवालीकडील कारकून बालाजी दतात्रय यानी लांच खाऊन ती गोष्ट दाबण्याचा प्रयत्न केला. ते बैलाचे मांस असून

तळेगांवाहून आणले असें भासविण्याचा प्रयत्न केला पण त्याचा गुन्हा उघडकीस आला. तेव्हा त्यास दंड करण्यांत आला. जातिबहिष्कृत करून काशीयात्रेचे प्रायश्चित सांगण्यांत आले.

[14-9-1772

१६ जमादिलाखर

विठोजी बिबवा यासी पत्र, गंगापुरी येथील इमारतीच्या कामाचे हिशोब तपासल्याबद्दल.

[19-9-1772

२१ जमादिलाखर

प्रीतिसिंग बुंदेले मरण पावले. त्याच्या मुलास २१००० ची सूट देण्यात यावी म्हणून बाळाजी गोविंद यासी पत्र.

पेशव्याचे संगमनेर येथील बाग :

खास बाग

बाराव बाग

रुस्तुम बाग

---

No. 224] [24-9-1772

२६ जमादिलाखर

रामचंद्र सिवाजी कमावीसदार तालुके सोलापूर यासी पत्र. कलपा काटकर तुलजापूर येथे जत्रेकरितां गेला. परत येताना त्याच्या बरोबरीच्या लोकाना चोरानी लुटले आणि १२००० रु. चा माल लांबविला. चोरांची टोळी मौजे मसले येथील असावी असा त्याचवेळीं कांहीं जणाना संशय आला. कांहीं दिवसानीं त्या टोळीपैकीं एक जण पकडला गेला. यावरून कमावीसदार यासी हुकूम देण्यात आला कीं गुन्ह्याची चौकशी व्हावी व मसले येथील लोकांना योग्य शिक्षा देण्यांत यावी.

[26-9-1772

२८ जमादिलाखर

बालाराम मणिराम याने ब्राह्मण स्त्रीवर बदनजर ठेविली यास्तव त्यास १००० रु. दंड करण्यात आला. दंड वसूल करण्याकरतां त्याचें घरदार विकून मालमत्ता जप्त केली.

देणे नवाब निजामअलीखान यास विा राजश्री रावसाहेब छ १७ रोज उदेसिंग खिजमतगार याजबरोबर पाठविले घड्याल थोरले रागमालिकेचे बाा स्वारी विसाजी कृष्ण प्रांत कर्नाटक पैकी फुलचरी बाा फिर्गाणी सामान सुधा किमत रु ५०००.

हैदराशी तह झाल्यावर सरदारखान व मीर रेजा यासी मुक्त करण्यांत आलें. परत जातांना त्यासी मोलवान वस्त्रें देण्यांत आलीं.

---

*No. 225*]

[*3-12-1772*

नारायणराव पेशवे.

७ रमजान सलास सबैन

नवलसिंग जाट याजकडील बातमी पुरविण्याकरिता भगवंत गोविंद यास नेमले असे.

शेवकराम झाबेताखानाकडील बातमीकरता.

[*6-12-1772*

१० रमजान

साताऱ्याहून छत्रपतींनीं पेशव्यास नजर केलेली हत्यारं दागिने वगैरे :

ढाल
तलवार म्यानासहित
तेगा
जवाहीर ५०
पाच ४
जवाहीर १६
पेटी
खुरास
रत्नखचित तलवार
कमरपट्टे २

खर्च पोतापैकी

दिमत हुजर राज्यास नजर व धनीस १८१-०-०

श्रीशाहु छत्रपति माहाराज यांच्या सिहांसनाजवळ ठेविले ८१-४-०

[15-12-1772

१९ रमजान

बालाजी निंब्रज याने सरकारात येऊन विदित केले कीं आपला भाऊ सदासिव मरण पावलेमुळे आपण संकटांत आहो. तरी घरपटी आपणास माफ असावी. यावरून त्यास ६२९ रु. घरपटी माफ करण्यात आली.

[18-12-1772

२२ रमजान

सदासिवभट नानल वैद्य याच्या औषधाने छत्रपतीस उतार पडला सबब त्यास नसरापूर ता॥ खेडेबार येथे एक चावर जमीन इनाम.

---

No. 226] [20-12-1772

२४ रमजान

निंबगाव वाघा पा॥ पारनेर हे अंताजी माणकेश्वर याची स्त्री आऊबाई इजला इनाम दिले आहे; तरी तिला उपसर्ग न लागू देणेबा॥ पत्र कमाविसदारास.

छत्रपति माहाराज यासी मेजवानी देण्यात आली त्यासमयीं नाच झाला.

नाचणारींची नावे.

चंदा नाइकीण वदनकर

पिरा ,, पनालेकर

आछा ,, कोलेकर

सदा ,, खेडकर

जैना ,, ,,

मैना ,, ,,

आनंदी सुपेकर

सगा सुपेकर

गुलाब पुणेकर

मोहिना पालकर

मिरा पालकर

हिरा पालकर

अना सातारकर

[21-12-1772

२५ रमजान

परत जातेसमई पेशव्याने छत्रपतीस केलेली नजर

| | |
|---|---|
| २५०– ०–० | मंदील |
| ६१८–१२–० | चादर बादली |
| २१३– ०–० | झगा बादली |
| २५०– ०–० | किमखाप |
| ६०– ०–० | पटका |

## सवाल सल्लास सबैन.

No. 227] [29-12-1773

४ सवाल

रघूजी आंग्रे यासी पत्र, इंग्रजाचे आरमार विजदुर्गाच्या आसपास घिरट्या घालीत आहे तरी सावध राहणेबदल.

[2-1-1773

८ सवाल

टॉमस मॉस्टिन याजकडून नव्या पेशव्यास सन्मानाचीं वस्त्रें.

[13-1-1773

१९ सवाल

रेवदंड्याहून आलेल्या एका इंग्लिश वैद्यास दरमहा रु १५०

[23-1-1773

२९ सवाल

दाऊदशाह फकीर याजकडून गाय मारण्याबदल दंड रु ६०

विष्णूच्या देवळाच्या छताला सोन्याचा मुलामा केला सबब खर्च १४–९–६.

गवत कापणाऱ्या लोकास गवत कापणेबद्दल १००० पेंड्याना २ रु मिळावे. त्यांच्याकडून फुकट काम घेऊ नये म्हणून पागास सनद.

---

No. 228] [26-1-1773

२ जिल्काद

सर्वोत्तम शंकर यासी सनद

बापूभट घारपुरे याने नाशिक येथे श्री हरिहरेश्वराचे देऊळ बांधले. त्याच्या खर्चाकरता पा। नाशिक अगर वणदिंडोरी परगण्यातील ४०० रुा चे गाव देण्यात यावे म्हणून सनद.

१

---

No. 229] [24-2-1773

२ जिल्हेज

१७७३ मधील कापडपेठेंतील व्यापाऱ्यांचीं नांवे

१ आबाजी नाईक कांब्रस

२ रामचंद्र नाईक परांजपे

३ बापूजी गोविंद दातार

४ कृष्णाजी नाईक दातार

५ बाबूजी नाईक दातार
६ आपार्जा हरि जोशी
७ नारोबा नाईक नातू
८ रंगो महादेव खुमकर
९ मल्हार नाईक कान्हेरे
१० विठोबा नाईक काले
११ श्रीनिवास नाईक तांबेकर
१२ गोपाल बलाल साने
१३ बालाजी गोविंद जोसी
१४ वेकांजी नाईक तरलेकर
१५ कासीनाथ नाईक अनगळ
१६ चिमाजी नाईक कोले
१७ बालपा नाईक पुराणिक
१८ आपाजी नाईक सांडू
१९ जगन्नाथ गंगाधर गोळे
२० नारोबा नाईक घुगरी
२१ बालाजी नाईक साखरे
२२ रामाजी हरि भिडे
२३ बनपा ना। अनगल
२४ कृष्णाजी ना। कडु
२५ केसोबा ना। सोहोनी
२६ रामनाथ ना। घुगरी
२७ भिकाजी गोविंद गोडबोले
२८ कृष्णाजी भैरव थते
२९ केसोबा नाईक कागदी
३० सिधोबा नाईक बेहरे
३१ छबिलदास बऱ्हाणपूर
३२ माधवदास गोडीदास
३३ केशवभट कर्वे
३४ नारोबा नाईक ओक
३५ त्रिंबकराव दिक्षित
३६ धोंडो कासी कुंटे
३७ बहिरवभट थते
३८ रंगो नारायण करकरे
३९ शामजी गोविंद तांबेकर
४० रामजी बापूजी साठे
४१ त्रिंबक रामजी अनगळ
४२ वेकांजी माणकेश्वर
४३ नारोबा नाईक कावले
४४ पाडुरंग नाईक नवरे
४५ हरबाजी ना। वानवळे
४६ केसोबा ना। करमरकर
४७ लक्ष्मण ना। चाबूकस्वार
४८ पांडोजी लकडे
४९ कासीनाथ ना। थोरात
५० मार्तंड ना। तासके
५१ आबाजी ना। तासके
५२ रामजी ना। दातार
५३ महादोबा ना। मेढे
५४ कृष्णाजी वेंकाजी तांबेकर
५५ वेंकाजी ना। बेहरे
५६ कृष्णाजी ना। भावे
५७ त्रिंकब ना। मालपूरकर
५८ निंबाजी ना। दसपुत्रे
५९ दिनानाथ ना। महाजन
६० वाघोजी बागडे
६१ सिवराम ना। भिडे
६२ आपाजी शंकर भिडे
६३ नारो भैरव मेहेंदळे
६४ गंगाधर ना। वानवळे
६५ रामाजी ना। कानडे

६६ बाबूदेव पैठणकर
६७ महादजी जिवाजी परांजपे
६८ गोपाळ नाईक कानडे
६९ सखाराम ना। भिडे
७० संभू ना। पारगावकर
७१ केसोबा ना। सोराटी

---

*No. 230]* *[27-2-1773*

९ जिल्हेज

उत्तर हिंदुस्थानातून मराठ्यांचा विजय होऊन पादशाहाशी तह झाला हे वर्तमान आणण्याबद्दल जासुदास ५० रु. बक्षीस.

मोतीगज व मनोहर, हे पेशव्याचे दोन हत्ती आजारी असताना जेजुरीच्या श्रीमार्तंडास नवस करण्यात आला. ते हत्ती बरे झाल्यानंतर श्रीस ४०० रु. भंडारा व मेवामिठाई वाटण्यात आली.

*[4-3-1773*

१० जिल्हेज

हातगडचा किलेदार खोजे दायम यासी मौजे कलवण बु॥ पा। वोतूर प्रा। बागलाण हा गाव इनाम देण्यात आला. त्याला औरस संतती नव्हती. त्याचे मृत्यूनंतर त्याचा लेकवळा जो होता त्याने आपल्या नावे गावची सनद करून घेतली. किल्लेदाराच्या विधवेने ही गोष्ट सरकारच्या नजरेस आणून दिली तेव्हां पूर्वीची सनद रद्द करण्यात येऊन त्याच्या विधवा बायकोस सालिना १००० रु. वर्षासन देण्याचे ठरले.

*[5-3-1773*

११ जिल्हेज

सासवडच्या शिंप्यापैकी गंगाजी सर्वज्ञे याने लग्नामध्ये जातिबाह्य वर्तन केले. पुणे येथील शिंप्याच्या जातीने त्याच्याबरोबर जेवण केले. हे सासवडच्या शिंप्याना पसंत न पडून त्यानी ही गोष्ट जातपंचापुढे मांडली. पंचानी पुण्याच्या शिंप्याना १५००० रु दंड ठरविला आणि सासवड्याच्या शिंप्यानी सरकारांत १०००० रु. भरणा करावा असे ठरले.

---

*No. 231]* *[6-3-1773*

१२ जिल्हेज

कृष्णराव बळवंतराव यास त्रिंबकराव विश्वनाथ याजकडे कर्नाटकांत रवाना केले. वाटेत खर्चाकरिता त्याने हरपनहल्लीच्या सोमनाइकाकडून २५००० रु. घेतले. तेवढ्या रकमेची सोमशेखर नाइकास सूट.

[8-3-1773

१४ जिल्हेज

धारवाडच्या कमाविसदाराचे हिशोब तपासण्याकरिता ४ कारकून रवाना केले.

[9-3-1773

१५ जिल्हेज

अम्बादास जिवाजी याला राहुरी पा। संगमनेर येथें दिवाण नेमण्यात आले. संगमनेरच्या कमाविसदाराने त्यास कामावर घेण्याचे नाकारले. अम्बादासने पुण्यास तक्रार केली. तेव्हां त्यास कामावर घेण्यासंबंधी पुण्याहून हुकूम देण्यात आला.

[10-3-1773

१६ जिल्हेज

मातुश्री गोपिकाबाई इच्या खाजगत खर्चासाठी

१ म्हसुल

२ सुकेणे

३ वडनेर, ही गावे देण्यात आली.

[13-3-1773

१९ जिल्हेज

बालकृष्ण नारायण नेने याची स्त्री, पार्वतीबाई इची बहीण, ईस रजोदर्शन प्राप्त झाले सबब वस्त्रे कि. २८२-१-२०

प्रचारात असलेल्या तेव्हांच्या कांहीं मोहरांची नांवें.

| | | |
|---|---|---|
| १ औरंगाबादी | रुजू शाहाजानी गैरसाल | |
| २ नादरशाही | ७ हैदराबादी | १२ सुर्ती |
| ३ प्रयाग | ८ अजमेर व मथुरा | १३ इटावा. |
| ४ तुगच्या | ९ अलजपूर | |
| ५ कुन्याच्या | १० भावनगरी | |
| ६ मल्हारशाई | ११ बासबरेली | |

---

*ITEM No. 14 : 1795-1796*

No. 232] [19-7-1795

छ २ मोहरम सीत तिसैन

१८ मेस्त्र मालिट वकील दिा। इंग्रज कलकत्तेकर याणी मुंबईहून वाघ दोन सरकारात पाठविले त्याजबा। खर्च.

¶*Mr. Malet presents to the Peshwa two tigers brought from Bombay. The years 1795-96 mark a great transition in Maratha politics and consequently the entries for these years throw new light on many incidents and occurrences in the Peshwa's kingdom.*

No. 233] [29-7-1795

छ १२ मोहरम सीत तिसैन

बक्षीस खर्च देणे पहिलवान याणी वाड्यांत कुस्त्या घेतल्या; सबब सोने वजन तोळे १८८।· नरसोबा पंतोजी ब्राम्हण पहिलवान दिा दौलतराव सिंदे यासकडे १ येकूण किंमत रुपये ३१४।.

[31-7-1795

छ १४ मोहरम

ग्रहणाचे पूर्वी वेधात त्रितीय प्रहरी दिवसास उपहार केला साा तज्जनित दोषनिरशनार्थ प्राजयापत्य प्रत्याम्नाय गोनिष्क्रयार्थ दान समस्त कर्वे उपाध्ये यास दिल्हे त्यास तुकडा सान्याचा येक दर तोला रुपये १५। प्रो.

[11-8-1795

छ २५ मोहरम सीत तिसैन

देणे मेस्त्र डंकीण जनराल श्रीकासी दिमत इंग्रज कलकत्तेकर यांस सरकारांतून वस्त्रें पाठविली; त्याजबरोबर बालाजी जनार्दन फडणीस याणी रुबरू पाहून जगंनाथ हरि कारकून निा कासी बल्लाल यासमागमे सिरपेच पाठविला; तसलमात खुद किंमत रुपये २५०॥·

---

No. 234] [5-9-1795

छ २० सफर सीत तिसैन

दफाते बाळाबाई शितोळे, माहादजी शिंदे यांची कन्या इजसाठीं साडी-चोळीबद्दल पो मजकुरपैकीं येक गांव कमाल आकाराचा रुपये १००० चा करार करून हे सनद सादर केली असे म्हणोन लक्ष्मण हरि काादार पो बोदवड प्रांत खानदेश यांचे नावे सनद १

दौलतराव शिंदे याणी हुजूर विनंती केली कीं आपले तीर्थरूप कैलासवासी माहादजी शिंदे याचे छत्रीचे खर्चास येक गांव नेमून देविला पाहिजे म्हणोन त्याजवरून मौजे उरली ताा साडस प्रां पुणे २०५० रुपये कमाल वेरजेचा मारनिलेकडे छत्रीचे खर्चास करार करून देऊन हे सनद तुम्हास सादर केली असे म्हणोन रामचंद्र नारायण यांचे नांवे सनद १.

[7-9-1795

छ २२ सफर

जामदारखाना

२३०० खांसा परशराम रामचंद्र यांस नवाब निजामअल्लीखान याचे लढाईत जखम लागली व मारनिलेस सरकारांतून चौघडा दिल्हा सबब वस्त्रे खाजगी राजश्री रावपैकीं. सनगे येकूण आंख

१८० तिवट १
१२६० दुपटा १
१६० झगा धुवट १
७०० तुंबा किमखापी १

२३००

१५१ विसाजी नारायण वाडदेकर यास जखमेची वस्त्रे सनगे आंख
४९ तिवट १
१०२ सेला जाफुरखानी

१५१

२४५१

No. 235] [9-9-1795

छ २४ सफर

रत्नशाळा देणे पटवर्धन मंडळी याजकडील लढाईत जखमी झाले त्यांस राजश्री राव याणी दागिने दिल्हे किमत रुपये २४००

१ रामचंद्र परशराम यांस सन आर्बा तिसेनात कोल्हापूरचे लढाईत जखम लागली होती साठीं बहुमान कंठी मोत्याची किंमत रुपये २०००

१ खासा चिंतामणराव पांडुरंग यांस कंठी रुपये २०००

१ गंगाधरराव गोविंद याचे पुत्र घरास गेले साठी त्याचे सिरपेच परशराम रामचंद्र याजवळ दिल्हे किंमत रुपये ४००

१ नारायणराव गंगाधर यांस सिरपेच.

No. 236]

१ माधवराव गंगाधर यांस सिरपेच.

१ श्रीपतराव मोरेश्वर यांस सिरपेच.

१ रघुनाथराव निळकंठ कुरुंदवाडकर घरास गेले साठीं सिरपेच किंमत रुपये १००० परशराम रामचंद्र याजवळ दिल्हा.

१ हरि परशराम यांस सिरपेच १

१ माहादाजी परशराम यांस सिरपेच १

१ गणपत परशराम यांस सिरपेच १

---

No. 237] [13-9-1795

छ २८ सफर

किरकोळ

१२० अबदुल रहिम वा। शेख अहमद औरंगाबादकर घड्याळाचा कारागीर यांस रोजमुरे येकमाही रसानगी याद. रुपये ६० छ १ मोहरमचा, ६० छ १ सफरचा;

४५ शेखअल्ली शस्त्रवैद्य दिमत हुजरात यांस रोजमुरा दुमाही छ १ सफरचा रा। याद रुपये

---

No. 238] [21-9-1795

छ ७ रबिलावल

किरकोळ

१२ धर्मादाय विद्यमान राजश्री राव: ज्वर येत होता साठीं बारा दिवस स्नान संध्या अंतरली. तज्जनित दोषनिरसनार्थ द्वादश सहस्र गायत्रीजप करावयास भास्करभट टुल्लु त्रिंबककर लाविले होते त्यास दर हजारी दक्षणा रुपये १ प्रमाणें.

---

No. 239] [10-10-1795

छ २६ रबिलावल

देणे रामसिंग बोस सिलेदार यांस साल गुदस्ता निजामअल्लीखान याचे लढाईत जखमा लागल्या सा। बक्षीस, विद्यमान राजश्री राव; सदरेस रुबरू पाहून दिल्हे: कडे सोन्याचे सोने बाबद तसलमात रुपये ३००.

No. 240] [18-10-1795

सीत तिसैन

छ ४ रबिलाखर मानाजी आंगरे वजारतमाब

सरखेल यांस राघोजी आंगरे मृत्यु पावले सबब सरखेलीची वस्त्रे पेशजी-प्रो विा राजश्री राव रुबरू पाहून बापूजी बावाजी अभ्यंकर यांजबरोबर पाठविले

| | | |
|---|---|---|
| ७८ | तिवट | १ |
| ३१० | दुपटा | १ |
| ३९॥· | महमुदी | १ |
| १२० | किंमखाप | ·॥· |

५४७॥·

३॥·

३०९।· कानोजी आंगरे यांस

---

No. 241] [18-10-1795

छ ४ रबिलाखर

दफाते

तालुके झांसी येथील मांमलत रघुनाथ हरि याचे नांवे होती त्यांस ते मृत्यु पावले साठीं त्यांचे बंधु सिवराव हरि यांचे नांवे सांगितली येविसी चिटणसी पत्रे

४ तुकोजी होळकर; दौलतराव शिंदे;
अलीबहाद्दर; बाळाजी गोविंद;

७ संस्थानिक वगैरे यांस.

१ छत्रजित राजे संस्थान दतिया;
१ विक्रमाजित राजे संा वोडसे.
१ रामसिंग राजे संा नरवर.
१ रामचंद्र राजे संा चंदेरी.
१ रंजितसींग राजधर गुजर सिमथरकर.
१ माहाराज देव आहाखले.
१ अष्टभयानीस.

2544

No. 242] [20-10-1795

छ ६ रबिलाखर

जमा

१४१२० का खंडणी सां गदवाल निा राजे राम भूपाल याजकडे इा सन इसने तिसेन ता सन आर्बा तिसेन तीन साला खंडणीचा ऐवज सरकारांत घ्यावयाचा करार केला आहे त्यापैकीं भरणा गुा शेषगीरराव मेलगिरी वकील सां मजकुर.

---

No. 243] [1-12-1795

छ १८ जमादिलावल

१२५ हैबतराव धायगुडे सिलेदार पागा दिा जगंनाथ रघुनाथ यास छ १९ साबान सालगुा नवाबाचे लढाईत उजवे हाताचे दंडास तरवारीची जखम लागली ती बरी जाली नाही साा चवथ्याने खर्चास रसानगी यादी.

---

No. 244] [4-12-1795

छ २१ जमादिलावल सीत तिसैन

जामदारखाना

कमावीस भेट बाबद प्रसाद श्रीव्यंकटेश वास्तव्य गिरी यास पेशजी हरि बल्लाल फडके याणी पटणचे स्वारीत नवस केला होता तो हरिभक्ती याचे मार्फतीने पाठविला सबब देवाचा प्रसाद आला तो गुा परशराम दामोदर दिम्मत चिंतामण हरि, चिरा जरी १ येकूण.

---

No. 245] [10-2-1796

छ ३० रजब सीत तिसैन

१८९७५४ पर्वतीस रमण्यांत दक्षणा ब्राम्हणांस दिल्ही पैा वजा रामाजी भदे शागीर्द निा गोविंदराव निलकंठ याणे दक्षणा आपले वलखीवर सिपारस करऊन अकरा रुपये घेऊन रमण्यांत जात होता त्यास परीक्षा न घेता अकरा रुपये दिल्हे म्हणून सरकारचे खिजमतगारांनीं धरुन आणिले. त्याची चौकसी करिता विद्वान नाहीं, सबब दक्षणा माघारी घेतली ते आा १ रु. ११.

2545

No. 246] [23-2-1796

छ १३ माहे साबान सीत तिसैन ( खर्च )

नवरात्र खर्च वाड्यांत गोंधल जाहाला; सबब गोंधळी वगैर यांस साल गुाा प्रमाणे साल मजकुरी रसानगी याद चिठी छ १४ जाखर कापड आंख

५० गोंधळी यांस

३८॥। काकडे वातीस सेला साधा धुवट उतारी सनग ॥

१६ श्रीदेवीस लुगडे व खण मिलोन

१३।. मथी माळीन इजकडून फुलाच्या माळा घेतल्या सबब.

८॥। जोगीणी उदगार घालितात त्यास आा ५ येकूण आंख

---

[24-2-1796

छ १४ साबान

विठू पारनेरकर गवई यांस मोईन साल गुदस्ताप्रमाणे साल मजकुरी रसानगी यादी चिठी छ ६ साबान कापड आंख १२५

[25-2-1796

छ १५ साबान

६४ सोमाजी वाघ याचे भाऊ खेत्रोजी वाघ नवाब निजामअलीखान याचे लढाईत सालगुदस्ता सरकारकामास आले साा खेत्रोजी वाघ यांस रोजमुरा आठवड्यास पावत होता त्याप्रमाणे छ १ सवाल पासून याचे नावे करार करून देविला तो.

---

No. 247] [5-3-1796

छ २४ साबान सीत तिसैन

श्रीगणपति उत्साह खर्च कलवातिणी वगैरे यांस बिदाईखेरीज बक्षीस दुपटे दिल्हे.

वेंकट नरसी कर्नाटकी

धर्मी पारी

गंगा पखवाजी

भिकोबा गवई वाईकर सनगे यो
आंख लुगडी
३७ १४॥, १६॥.

---

No. 248] [10-3-1796

छ २९ साबान सीत तिसैन
रत्नशाळा

इजाफत जमा खासगी कैलासवासी रावसाहेब याचे खासगीकडे दागिने होते त्यापैकीं हाली कारखाने मजकुरी आणून विसाजी लक्ष्मण आपटे कारकून सिलेदार याणी जमा धरावयास सांगितले.

३ हातघड्याले खासगीकडून यैवज देऊन परभारी घेतली होती ते किंमत रुपये २७७७।.

१ प्रा गुा बाळाजी आबाजी नेने हातघड्याल तीन काव्याचे साखली च्यार पदरी शेवटास घंटा १ व अतरदाणीचे घर येक व किली तांबे विलाइती किंमत ६३९.

१ प्रा गुा अबदुल रहिमान घड्यालची हातघड्याल कीटचे किमत रुपये १६९१॥.

१ डबी बा (कट?) दिा इंग्रज कलकत्तेकर कर्नाटकचे स्वारीतून पाठविली ते बदामी विलाइती वर रंग निला दोरवे वजा छडी आत लहरी आहेत; झाकणाचे माथा चित्रे फिर्गाणी दोन आहेत. आत साधी घाट तांबे साा झाकणे किमत रुपये १५०

---

No. 249]

१ पटी पितलेची वर नली काचेची मध्यें बसविली आहे. आत पारा प्रकृती पाहावयाची बा इंग्रज पो किमत रु. १४

१ दुर्बी नली लाहान बा बच्याजी रघुनाथ मेहेंदळे पो घर हिर्वे चर्मी कांडी दोन पांढरी रुप्यासारखी आहेत व येक कांडे रोगणाचे हिर्वे गवसणी गजनीची रूपये १००

No. 250] [11-3-1796

छ १ रमजान

दिा सिकारखाना याजकडे पक्षीं यास चारावयासी ताा इमाम वाा नजरमहंमद मीरसिकारी वजन तोळे

८१ बंगाली मैनास कस्तुरी उंच

२॥।१ बाजजुरे यांसी

॥॰ लवंगा

।१ वेलदोडे

।१ पत्री

॥२ जाइफळ

।१ केशर

।१ कस्तुरी उंच

।१ मुाा इसंगी

---

No. 251] [14-4-1796

तेरिख ७ चैत्र शके १७१८

बाा देणे गाइकवाड पाा लक्ष्मण बल्लाळ सिलेदार यांनी साल गुाा सन खमस तिसेनांत नवाब निजामअलीखां बहादर यांचे लढाईत कामकाज केले; सबब बक्षीस ३८००.

[18-4-1796

छ ९ सवाल

कृष्णराव पाटणकर सिलेदार याची घोडी सन सबा समानीनात टिपूचे छाप्यात गोळा लागून पडली. तिची किमत ७५० रु. पैकी ४५० रु. परगणे बलसाड वगैरे माहाल निाा आनंदराव भिकाजी याजकडोन देविली.

[19-4-1796

छ १० सवाल

गोपाळराव धोंडदेव नलेगांवकर सिलेदार यांस सन इसने तिसेनात स्वारी श्रीरंगपट्टण विाा हरि बल्लाळ याजबरोबर होते. त्यांस रोजमुरे दिले. बाकी देणे मााानिले मागाहून पथक घेवून येत होते; त्यास मार्गी बलवंत सुबराव धर्मवर वगैरे

प्रांती सरकार कामास होते त्यांनी राहाहून घेतले. पुढे मदगिरी नजीक टिपूचा छापा पडला. लोक जखमी झाले. घोडी पाडाव गेली. जखमी वगैरे लोक लष्करांत आले त्यांची गणती वगैरे घेऊन रोजमुरे दिले.

बळवंतराव बापूजी यास जखमा भारी याजकरिता निरोप घेऊन घरीं गेले बद्दल २०० रु.

---

*No. 252]* *[23-5-1796*

छ १९ जिलकाद

१७४०॥= श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपति स्वामी याजकडे सातारियास राजश्री चिमणाजी माधवराव यास पेशवाईचे पदाची वस्त्रे आणावयास त्रिंबकराव अमृतेश्वर पेठ्ये पाठविले होते त्यास तेथे खर्च जाहाला तो गुा सिदोजी कांब्या खिजमतगार.

५४०॥= नजर करावयास

१०८८= माहाराज यांस

१०८८= मातोश्री आईसाो यांस

१०८८= राजश्री प्रतापराव पुत्र यांस

१०८८= वाडा पहिला

१०८८= वाडा दुसरा

१२०० इनाम माहाराज यांजकडील शागीर्दपेशा वगैरे यांस नख्त.

---

*No. 253]* *[23-5-1796*

छ १९ जिल्काद

राजश्री चिमणाजी माधवराव यांस पेशवाईची वस्त्रे सातारियाहून आणली; सबब दिाा हुजारत सनग येकून आंख.

श्रीमंत माहाराज राजश्री छत्रपती यांजकडील मंडळी.

३३४ निळकंठ बाबूराव मजमदार यांस सनगे

४१७ कृष्णराव अनंत भानु कारभारी यांस

४०१॥ बाबूराव कृष्ण किले सातारा यांस.

२२३॥। रामचंद्र हैबतराव पंडितराव यांस.

२२४ रणसिंग मोहिते रामराजे यांचे मेहुणे यांस.

२२३ खंडेराव सिंदे अहिल्याबाईचे पुत्र यांस.

१९० मोरो खंडेराव बक्षी यांस.

२८८ चत्रसिंग भोसले यांस.

१६० त्रिंबकराव गोपाळ सुमंताचे मुतालीक यांस.

१४९॥। राघोजी मोहिते यांस.

---

No. 254] [26-5-1796

छ १८ जिलकाद सीत तिसैन

रत्नशालेपैकी.

देणे दिंमत दौलतराव सिंदे यास बहुमान विद्यमान राजश्री आपासाहेब सदरेस रुबरू पाहून दिल्हे किंमत रु. १०८०६ जडाव दागिने २

खासा दौलतराव यांस किंमत रु. ७५७५.

---

No. 255] [26-5-1796

छ १८ जिलकाद (खर्च)

१ सिरपेच घाट साधा बा। चिंतामण हरी फडके

१ कंठी मोत्याची बाबद तुकोजी होळकर.

१ सदाशिव मल्हार दिवाण यांस सिरपेच घाट साधा.

१ बाळाजी अनंत पागनीस यांस कंठी मोत्याची.

१ धोंडो रामचंद्र यांस सिरपेच

१ नारायणराव जिवाजी बक्षी यांस सिरपेच.

१ सदाशिव बापूजी फडणीस यांस सिरपेच.

---

No. 256] [3-6-1796

छ २६ जिलकाद सीत तिसैन

धर्मादाव खर्च वाड्यांत विद्युत्पातनिरशनार्थ लक्ष होमात्मक शांतीस सामान बा।

१ तोला केशर

२ ,, कापूर

[3-6-1796

छ २६ जिलकाद सीत तिसैन

२०७० ता। लाला चिमणलाल कारकून सिलेदार यास शोर जनरल याजकडे कालकत्त्यास सन आर्बा तिसेनांत हती व घोडे व पोशाख देऊन सरकारांतून पाठविले.

---

No. 257] [3-6-1796

छ २६ जिलकाद सीत तिसैन

परदरबार खर्च दिमत नबाब टिपू सुलतान बाहादर याजकडे सालगु। राघो शंकर कारकून नि। फरासखाना यांजबराबर सरकारांतून आहेर पाठविला ते समई सनगे खर्च जाहाली ती.

२०२ व्यंकटराम जोशी यांस.

२९८॥०. अहमदखान पुढे हस्तबलीस आले ते समयीं.

---

ITEM No. 15 : 1805-1811

No. 258] [1805-1811

**[दु. बाजीराव पेशव्यानीं स्वहस्तें लिहून ठेवलेल्या खाजगी जमाखर्चाच्या रुमालांतील कांहीं उतारे]**

खमस मयातेन मोहरम

१९१ येका इंग्रजास मेजवानीबा। खर्च

[24-4-1805

१५९७ रा। इंगरज सिदनम वकील यास मेजवानी केली

छ २३ मोहोरम

---

खमस मयातेन साबान

[23-11-1804

छ १९ साबान

२६० इंग्रज व नवाब याकडील ग्रहस्त आले त्यास मेजवानी २६०

[January 1805

खमस मयातेन सवाल

१२२९ कर्णेल वालीस लस्करातून आले सा। त्यास मेजवानी केली त्याबा।

खमस मयातेन जमादिलाखर

१२७६ कर्णेल कलोष त्यास मेजवानी केली ते वेळी सनगे खर्च जाला

¶*The period covered by these entries 1805-1811 is the beginning of British supremacy in India and how gradually Bajirao II began to realise his new position as a subordinate prince can be fairly gathered from these entries.*

---

*No. 259]* *[7-11-1805*

सीत मयातेन माहे साबान

५०० बालाजीपंत सतार वाजवितात त्यास दिल्हे छ १४ साबान

*[23-11-1805*

सीत मयातेन रमजान

७०० हेमंत नाटकशाला तीर्थरुपाची तिला रोजमरापो ७०० रु. दिल्हे छ १ रमजान

*[27-12-1805*

सीत मयातेन माहे सवाल

५५२ इंग्रजास मेजवानी केली सा। सनगे खर्च छ ५ सवाल

*[27-5-1806*

सीत मयातेन रबिलौवल

८०० रमणा पर्वतीचा नीट करण्याबद्दल केसोपंत करंदीकर याचे हवाली केले छ ८ रोवल

---

*No. 260]* *[13-6-1806*

सबा मयातेन माहे रबिलावल

१६४१५ आमचे चौथे लग्न जाहाले सबब रमण्यात सिध्याबद्दल चिंतोपंत देशमुख याचे गुजारतीने चार दिवस सिधेखर्च केला छ २५ रबिलावल

२५७४४ वरील कारणाकरता रमण्यात दक्षणा वाटली छ २५ रालोवल.

४८०० कापड, वरील कारणाकरतां

६०० सासऱ्याकडील उपाध्यास दिले छ २६ रौवल

*[17-6-1806*

३००० नारायणराव गोपाल फाटक, नवे सासरे यास दिले छ २९ रोवल

[18-6-1806

सबा मयातेन माहे रबिलाखर

१४ इंग्रजास मेजवानी जाहली, सबब खिचडी बाा खर्च छ १ राखर

सबा मयातेन माहे जमादिलौवल

[18-7-1806

१०० माहुलीस स्वारी आली साा वाटले छ १ जमादिलावल

[1-9-1806

सबा मयातेन माहे जमादिलाखर

२५ वाईस जुल्फमबागेत गेलो तेथे मालियास २५ रु. दिले छ १७ जमादिलाखर.

[13-9-1806

२५००० श्रावणमासानिमित्य रमण्यात व वाड्यात दक्षणा २९ जमादिलाखर.

---

No. 261]

सबा मयातेन माहे साबान

हाली सिका रुपये मोडून चांदवड केले, तेव्हा दर शेकडा ८ रुपये प्रमाणे बट्टा द्यावा लागला.

[14-10-1806

९५०० शुक्रवारचे वाड्यासमोर जागा घरे आम्ही पूर्वी खरेदी केल्याच आहेत. त्या मोडून सगुणी कलवंतिणीचे घरचे दक्षणेस व चंद्रीचे घरचे दक्षणेस व तालिमखाना नवा शुक्रवारचे वाड्यापुढे रस्ता मधी टाकून बांधिला आहे ; त्याचे मुकाबिल्यास पूर्वपश्चम लांबीचा रस्ता मधी सोडून आम्ही घर बांधून त्यात कलवंतिणी बिन्हाडकरासारख्या ठेविल्या आहेत; त्या आमचे घरास साडेनऊ हजार रुपये लागले असत. लौकिकात ते घर कलवंतिणीचे म्हणवितो परंतु ते घर आमचे. कलवंतिणीचे नाहीं. छ १ साबान

८९०९ सदासिव माणकेश्वर नाना फडणीस यांचे वरी बिन्हाडी राहिले साा त्यास नवी भांडी, फरासखाना वगैरे सामान खरेदी करून दिली.

३६०० मोर दिक्षित मराठे व सौ सगुणाबाई दीक्षित याजकडील खर्चाचे १ वर्षाचे बेगमीस

४५० श्रीव्यंकटेशाचे उत्सवाचे ललिताचे रात्री रामचंद्र गोसावी याजकडून ललित करविले, सबब पोसाक सनगे

[9-11-1806

११ नाजुक खर्च जाहाला गुाा त्रिंबकजी छ २७ साबान

No. 262] [November 1806

सबा मयातेन माहे रमजान

४६० भाऊबिजेस घरातून वरील किमतीत सनगे खर्च केली त्याचे नावनिसीचा तपसील

१ पांडुरगराव बारामतीकर

१ दादा रास्ते

१ तात्या रास्ते

१ राघोपंत भागवत

१ मोरोबा भागवत

[23-11-1806

१०० सदाशिव माणकेश्वर यांचे गुरू नारायणबावा याचे घरी जाऊन खर्च केले छ १२ रमजान.

[30-11-1806

२०० मोरोपंत कवी बारामतीकर यांचे पुत्रास दिल्हे छ १९ रमजान.

[12-11-1806

१०७५ महीचे लढाईत तीर्थरूपाचे दंडावर घालावयाचे हिऱ्याचे कमळ हरवले ते सापडले सा येक हजार पंच्याहातर रुपये भवानगीर गोसावियास कराराप्रो कमळ आम्हास सापडून आले म्हणोन दिल्हे गा आन्याबा राहातेकर छ १ रमजान.

[10-12-1806

३०० आमचे लग्नात जेष्ठ मासी अत्तर गुलाब खर्च जाहाला छ २९ रमजान.

---

No. 263] [11-1-1807

सबा मयातेन व अलफ माहे जिलकाद

२१०० चंदन व वंदन येथील बंडापासोन रक्षणार्थ माहे गा ३०० लोक गुजारत त्रिंबकजी डेंगळे ठेवले आहेत त्यास माहे मजकूरचा रोजमरा छ १ जिलकाद

[11-1-1807

२००० इंग्रजाकडील वैद्याकडून घरांत श्रीदेवी काहाडविल्या त्या यथास्थित कृपा करोन आरोग्य जाहाल्या सबब त्या वैद्यास दिल्हे छ १ जिलकाद.

[11-1-1807

३८४ दोन इंग्रजास मेजवानी बाा सनगे छ १ जिलकाद

[21-1-1807

२००० श्रीकचेश्वरास धर्मशालेचे कामाकरितां कोंडोबा नानाचे पुत्र भाऊ गाडगील याजकडे कोपरगावचे मुकामी बालोबा निा विंचूरकर यांचे विद्यमाने पाठविले छ ११ जिलकाद.

[27-1-1807

१०५० हिरी कलवंतिणीस वरील किमतीत सनगे दिल्ही छ १७ जिलकाद.

[29-1-1807

४१० कोथरूडचे बागेतला आरसेमहाल जाया जाला तो उतम तयार करावयाबाा छ १९ जिलकाद

[29-1-1807

८६५ कोथरूडचे बागेतील जळमंदीर दुरुस्त करावयाबाा छ १९ जिलकाद

३७५ कोथरूडचे बागेत माहालापुढे चालतां तावदानी बंगला आहे तो दुरुस्त करावा याबद्दल छ १९ जिलकाद

५९५ कोथरूड बागेतील चौसोपी तयार करावयाबद्दल छ १९ जिलकाद

---

*No. 264*] [27-1-1807

५००० जिऊबाई भानू यास दरसाल १२००० रुपये खर्चास द्यावयाची नेमणूक आहे. ते छ १७ जमादिलाखरपावेतो पोहोचाऊन फडशा जाहाला त्या तेरखेपावेतो बाकी राहिली नाही. छ १८ जमादिलाखरापासोन तागाईत छ १७ जिलकाद पाच महिने पावेतो दरमाहा १००० रुपये प्रो ५००० रु. नेमणूक पो दिल्हे. छ १७ जिलकाद

[8-2-1807

१२५ चिंतोपत देशमुख याचे थोरले स्त्रीस नाहाण आले सबब आहेर केला छ २९ जिलकाद.

[16-2-1807

१६३२ तीर्थरूप गंगाभागीरथी मातुश्री अन्नपूर्णाबाई आजी ओक हिला दिल्हे छ ७ जिल्हेज.

[20-2-1807

४००० सदासिव माणकेश्वर तुळजापुर व कोल्हापूरच्या यात्रेस गेले त्याना दिले छ ११ जिल्हेज.

[14-4-1807

१०००० खुसरसेट मोधी यास बक्षीस दिले छ ५ सफर

[14-4-1807

१००० बालाजी मल्हार बापट यास बक्षीस छ ५ सफर

---

No. 265] [2-5-1807

सबा मयातेन माहे रबिलावल ऊर्फ वैशाख प्रभवसंवत्सर
सबा मयातेन माहे सफर

६५२० मातोश्री आनंदीबाईचा श्राद्धदिवस फाल्गुन वा। ११ ते दिवशी खर्च. छ २३ सफर

[18-5-1807

समान मयातेन रबिलावल उर्फ वैशाख

१३० जंग कवी पिंपलसकर यास १३० रुपयाचे किमतीत सोवले दिल्हे छ ९ रबिलावल

[20-5-1807

३२५ खुसरवांजी मोधी यास शालजोडी दिली.

१०० श्रीमाहाबलेश्वरास कोयनेचा ओघ नीट वाहावयाकरितां आपाभट याचे हवाली केले छ ११ रबिलावल

[7-6-1807

२०० राघोपंत थथे सिव्हगड किल्यावरून सरकार आज्ञेवरून सनदेप्रो खाली वो रा नीळकंठ शास्त्री थथे व रा आन्याबा अभ्यंगकर यांचे जामीनगतीने उतरून वाईस सरकार आज्ञेने गेले त्यास साल मजकूर सबा मयातेन जिल्हेज माघ मासाचे अवलीपासोन दरसाल २०० रु. सरकारातून देत जावे असे ठरले त्याप्रा दिले. छ २९ रबिलावल.

---

No. 266] [6-7-1807

समान मयातेन

रबिलाखर ऊर्फ जेष्ठ

५००० सदासिव पेठ कसबे पुणे येथे नाना फडणीस यांचे हौदातून विश्राम बागेत आमचे वाड्यात नहर चांगला उतमप्रत बांधून पाणी आणावयाबदल नारोपंत दातार याचे हवाली केले छ २९ राखर

2556

समान मयातेन
रमजान उर्फ कार्तिक

बाजीराव पेशवे या सुमारास कार्तिकस्वामीचे यात्रेस गेले होते. कारण यात्रेचे उद्यापन वगैरे केले आहे त्यासंबंधीं खर्च लिहिला आहे.

---

*No. 267]* *[1-11-1807*

समान मयातेन
सवाल उर्फ मार्गसीर्ष

९६० धोंडो गोविंद गोडबोले याजकडील पलटण नवलगुंदचे मुकामी छ १ सवाली लुटले. त्यामध्यें ३० घोडी थोर व तटे ३० उंटे तीन सापडली ती सरकारात घेऊन त्रिंबकजी डेंगला याचे तास ठेवली. त्यास हुजूरपागेचे सिरस्तेप्रमाणे व उष्टरखानाचे सिरस्तेप्रो माहे मजकूरची नेमणूक येकंदर हवाली केले छ १ सवाल.

*[22-11-1807*

१००० कृष्णया कर्णवारू यास दिले छ २२ सवाल

*[2-1-1808*

समान मयातेन जिलकाद उर्फ पौष

४०० त्रिंबकरावमामा ओक मृत्यु पावले सा क्रियेबद्दल देविले छ ३ जिलकाद.

*[18-1-1808*

४८३ हिराबागेत इंग्रजास मेजवानीचे वेळी वस्त्रे पोषाकाबा खर्च छ ७ जिलकाद

३१० पौष शुा ९ दुसरे घरातील श्राद्ध जाहाले.

१००० श्रीनिवासराव व गोविंदराव कांटीकर यास दिल्हे छ १९ जिलकाद

१००० तीर्थस्वरूप रमाबाई फडके सासू यास बक्षीस दिल्हे छ १९ जिलकाद.

*[8-2-1808*

समान मयातेन जिल्हेज ऊर्फ माघ

३००० बहिरोपंत सहस्त्रबुध्धे, सासूबाई देवधर यांचे तीर्थरूप, यास बक्षीस दिल्हे छ १० जिल्हेज.

*[9-2-1808*

१००० सगुणाबाई दिक्षित मराठे यांस बक्षीस दिले छ ११ जिल्हेज.

[9-2-1808

५००० काकू आजी ओक मृत्यु पावली; सबब क्रियेबाा छ ११ जिल्हेज
समान मयातेन मोहरम उर्फ फाल्गुन

[24-3-1808

१५ गंधर्व घोडा मेला साा १५ रुपये खर्च जाहाले छ २६ मोहरम.

---

No. 268]

तिसा मयातेन शके १७३०
जेष्ठ उर्फ रबिलाखर

७००० आबा ढमढरे याचे दुसरे लग्न अंताजीपंत जोसी याचे कन्येबरोबर जाहाले सबब त्यास दागिन्याबद्दल

२०० पांडोबा गोवळेकर शागीर्द यास सातान्यास आम्ही आपले वाड्यात ठेविला. (त्यास पगार)

[8-6-1808

१०० शाहूमहाराजाचे तक्त राजवाड्याजवल सातारास शहरात आहे तेथे नैवेद्य नंदादीपाबद्दल देविले छ १३ रबिलाखर.

१७८ इंग्रजास वस्त्रें दिली छ २२ रबिलाखर.

[24-6-1808

३६०० रुपये किंमतीत तालिमखान्यात लाल माती आणून तयार उतम करोन घालावयाबद्दल खर्च जाहाले छ २९ राखर.

---

No. 269]

तिसा मयातेन श्रावण उर्फ जमादिलाखर

१२५००० पोहोची हिऱ्याची बापू चिपळोनकर याजपासून खरेदी केली.

५००० मोत्याची नथ एक खरेदी केली.

४४०० श्रावण मास दक्षणा छ १२ जमादिलाखर

४११२ ,, ,, शहरातील दुखणाईत ब्राह्मणास दिली.

तीर्थस्वरूप सौ यमुनाबाई सासूचे वडील बहिरोपंत सहस्त्रबुद्धे (पिंपळवंडीकर?)

२५०० सखारामपंत जोसी सिंदे यांचे लस्कारात बातमीचे कामावर आहेत त्यांस सालमजकुरीची तैनात.

तिसा मया तेन १७३० शके आषाढ उर्फ जमादिलावल
सौ कासीबाई, त्रिंबकराव मामा ओक याची कन्या

[17-7-1808

६०० तोफखान्याचे खर्चाबद्दल माहे जमादिलावल व जमादिलाखर दुमाही बेगमीचे गणपतराव पानसे यांच्या हवाली केले छ २२ जमादिलावल.

---

No. 270] [2-9-1808

शके १७३०
रजब उर्फ भाद्रपद

त्रिंबकजी डेंगळा याचा सातारच्या डौलाचा कारभारी म्हणून उल्लेख आहे.

२७० शुक्रवारचे वाड्यात पांचवे मजल्यावर चौकोपऱ्यावर च्यार बंगले आहेत. त्यास दोनसे सत्तर रुपयाचे किमतीत खारवी पडदे केले छ १० रजब.

३१००० कृपानाथ आरगनाथ देव कासीकर याजकडून हिऱ्याची पोहची खरेदी केली.

५५०० खास बाजीरावाच्या खाशा पंगतीच्या शुक्रवार वाड्यातील भोजना-प्रा उतम सिधा तेरा महिन्याचा सातारचे छत्रपतीकरतां त्याचा मक्ता त्रिंबकजी डेंगळ्याने घेतला सबब त्यास दिले.

---

No. 271] [21-10-1808

शके १७३०
साबान उर्फ अश्विन

१०९६ इंग्रेजास मेजवानी दिली त्याबद्दल कापड वरील किंमतीचे.

१२९२ त्रिंबक आत्माराम गवई यास दिले.

२९८ ती. सौ रास्ते सासूबाई यास चोळखण दिले वरील किमतीत छ ३० साबान.

[2-10-1808

शके १७३० तिसा मयातेन
रमजान ऊर्फ कार्तिक

१०००० बलवतराव नागनाथ मृत्यु पावले सबब क्रियेस खर्च करविले गुा बाबूराव कात्रे.

No. 272] [20-11-1808

शके १७३० तिसा मयातेन

सवाल उर्फ मार्गसीर्ष

३७६ इंग्रजास मेजवानी केली त्याबा खर्च

३५०० विश्रामबाग वाड्याची वास्तुशांति केली त्याबा वि॥ गणेशभट उपाध्ये छ १ सवाल

[20-11-1808

५०००० पांडुरग बाबूराव बारामतीकर यांचे जातीस येकसाला बक्षीस दिल्हे छ १ सवाल

१००९ मार्गसीर्ष शु॥ ११ स पहिले घरातील श्राद्ध जाहाले सा खर्च- छ ९ सवाल

२००० नाना फडणिसांच्या सदासिवपेठच्या हौदाच्या नहराचे पाणी बिघडले सबब दुरुस्ती खर्च. मक्ता घेणार नारोपंत दातार

[10-12-1808

४००० विश्रामबागेतील सरकारवाड्याबाहेर नैऋत्य कोणात हौद करविला त्याबा खर्च. मक्ता घेणार नारोपंत दातार छ २१ सवाल

[12-12-1808

१०००० दाहा हजार रुपये विलासप्रकर्णी खर्च जाहाले छ २३ सवाल

---

No. 273] [31-12-1808

शके १७३० पौष उर्फ जिलकाद

५०० श्रीमंत माधवरावसाहेब व सौ रमाबाईसाहेब कैलासवासी जाहाली त्याच्या अस्ती कासीस पाठवावयाकरिता शुध्यर्थ खर्च जाहाले छ १३ जिलकाद

[6-1-1809

८०००० अमरचंद सावकार याजपासोन रामचंद्र गोसावी पैठणकर याचे गुजारतीने ऐशी हजार रुपयाचे किमतीचा १ मोत्यांचा कंठा सातपदरी सरकारात खरेदी घेतला छ १९ जिलकाद

[8-1-1809

१०० सखुबाई उगले धोंडभट भागवत यांची कन्या ईस दिले छ २१ जिलकाद

No. 274] [9-1-1809

तिसा मयातेन शके १७३० विभवनाम
जिलकाद ऊर्फ पौष
खर्चाचे बंद

३०००० णियाजेझुहित झखखटीनाझटेताडिनी धगाथायिणीजेकायंझाळेघीनवेनठटभ ठाजा चिहां कता घाझधाझाछुनजाटहहे झ भे सी जु हि त ठे टि छा ष ठा ने झे छ २२ जिलकाद*

पांडुरंगराव बारामतीकर कार्तिकमासी वारले असा उल्लेख आहे.

[18-1-1809

१६७२० अन्याबा राहतेकराबरोबर कर्नाटकचे स्वारीस सिबंदी पाठविली त्याबद्दल इा छ ११ जिलकाद माहे मजकूर ता छ १ जिल्हेज पेस्तर महिनाची तैनाते बरहुकूम रोजमरा

१४ बलवंतराव नागनाथ मेल्यामुळे त्याचे दोन खिजमतगार त्यांचे विनंतीवरून सरकारात नोकर ठेवले त्यांचा पगार.

२००० सातारियास सरकारवाडा आहे त्याची दागदोजी करावयाबद्दल

१०० त्रिंबकराव मामा ओक यांचे सांवत्सरिक श्राद्धाबद्दल त्यांच्या मुलास दिले.

[26-12-1808

१८९ पौष शुा नवमीस दुसरे घरातील श्राद्धानिमित्य खर्च जाले छ ८ जिलकाद

फाल्गुन तिसा मया शके १७३०

२१२९ कर्णेल कलोष यास कोपरगावी मेजवानी केली त्याबाबद

* असे वृत्त जमाखर्च बाजीरावाचे बरेच आहेत. नमुन्याकरितां हा घेतला आहे.

No. 275] [28-1-1809

माघ तिसा मयातेन शके १७३०

५०० नारायणरावबावा गोसावी पैठणकर यास धर्मादाव पांचसे रुपये देविले छ ११ जिल्हेज

१८०६ कर्णेल कलोष यास मेजवानी केली सा सनगे व मज्यालसी बाबत खर्च

---

No. 276] [March-April 1809

तिसा मयातेन व अलफ शके १७३१
सफर उर्फ चैत्र

जमेचे बंदांत आलेली काही मामलेदारांची नांवे

| | | |
|---|---|---|
| १ | देह जबोर व बाहादरपुरा | त्रिंबकजी डेंगळा |
| २ | सरसुभा प्रांत गुजराथ | ,, |
| ३ | ताा सावली प्रात गुजराथ | ,, |
| ४ | ताा साकसे प्रांत कोकण | चिंतोपंत देशमुख |
| ५ | रोहे व अष्टमी तर्फ रेवदंडा | निलकंठ सदाशिव कोलटकर |
| ६ | मौजे सिरढोण व सोमठणे ताा कल्याण | गणेश माहादेव फडके |
| ७ | मौजे ताम्हने ताा खारेपाटण ताा विजयदुर्ग | विसाजी कृष्ण रानडे |
| ८ | तालुके पानगांव व हलसंगी | त्रिंबकजी डेंगळे |
| ९ | मोकासा पैठण | त्रिंबक यशवंत |
| १० | बारसी वगैरे माहाल | सदासिव माणकेश्वर |
| ११ | कसबे खेड प्रांत जुनर | त्रिंबकजी डेंगळे |
| १२ | कसबे राक्षसभुवन वगैरे गांव | त्रिंबक येशवंत |
| १३ | कसबे ओतुर वगैरे गांव | गोविंद दिनकर |
| १४ | ताा चास | विठल चिमणाजी |
| १५ | फुटगाव प्राा कर्डे | सदासिव माणकेस्वर |
| १६ | मौजे डुबेरे प्रांत आकोले | मल्हारराव भिकाजी बर्वे |

2562

१७ बाग मौजे कात्रज ताा कर्यात मावल — राघोबा शेंड्या
१९ परगणे भोसे — मल्हार बाजी
२० मौजे नागझरी प्रां कराड — रामचंद्र आबाजी बाम
२१ तो गडवई प्रां हिंदुस्थान — सिवराव हरि
२२ मौजे कामरगाव वगैरे गांव प्रांत कडेवलित — बाजी त्रिंबक

---

[o. 277]

खर्चाचे बंद

३२७० पुण्यापासोन गंगातीरपावेतो व शयाद्रीपासोन राक्षसभुवनपावेतो भिल व बेरड व कोली वगैरे चोरव्यांचा उपद्रव कोठेहि होऊ नये. कोठे जाहाल्यास भरून घ्यावा याप्रमाणे त्रिंबकजी डेंगळे याने सरकारात करार पाठविला सबब (त्याचे खर्चास).

३४८६ पुण्यापासोन कऱ्हाडपावेतो दक्षण व शयाद्रीपासोन शंभु माहादेव-पावेतो पूर्व पश्चिम चोर दरवड्यासंबंधी करार वरीलप्रमाणे पुरुषोत्तम-राव बलवंत भागवत यानी घेतला त्यास खर्चास.

२२५० पुण्यापासोन सोलापुरापावेतो वरलिप्रमाणे बंदोबस्ताबद्दल पांडुरंगराव बारामतीकरास दिले.

[वरील रकमा दरमहाच्या आहेत.]

४० चतरसिंग भोसले याचे पुत्रास तैनातेबद्दल रोजमरा माहे मजकूरचा चालीस रु. दिल्हा छ १ सफर.

६० नागू गुरव तैनातेबद्दल रोजगुरा

८० देवीदास सारंगीवाला ,, ,,

१४० दावलखान गवई ,, ,,

१६ दोन आसामी मोर्चंगवाले यास माहे मजकूरचा तैनातेबाा रोजमरा

८ रामचंद्र हरी शेवडे

८ विठलशेट बिन रामशेट सोनार

२००० मौजे वेहेर ताा नाणेमावल तालुके लोहोगड येथील विहीर खणावयाबद्दल

[25-3-1809

१००० सौा कासीबाई पेठी हिला बक्षीस दिले छ ८ सफर

No. 278] [28-3-1809

२०९ विठोबा गोसावी ताहराबादकर यास दक्षणा दिल्ही छ ११ सफर

१८४४ कर्णेल कलोष यास मेजवानी खर्च कोपरगावास छ २३ सफर

२०३ चैत्र वा। येकादसी तीर्थरूप सौ मातुश्री मथुराबाई सा। यांचे सांवत्सरिक श्राद्ध जाहाले छ २३ सफर

४८९९ चैत्र वद्य द्वादसीस खर्च जाहाले छ २९ सफर. (या मोघम उल्लेखावरून काही गुप्त ठेवण्यासारखें कारण असेलसें वाटतें)

जेष्ठ

१०९०० तीर्थस्वरूप मातुश्री आका पराजपे मावसी श्रीकासीस गेली (तिला दिले.)

१००० ती। कैलासवासी सौ वहिनीबाईचे मातुश्रीस येक हजार रु. बक्षीस

३२० रु. चे किमतीत सरकारचे दोन बंद (?) होते ते नीट करविले छ २० राखर

(वैजनाथभट भागवत हे पूर्वी सातारचे किलेदार होते असा एक उल्लेख आहे.)

---

No. 279] [29-7-1810

इहिदे अशर मयातेन माहे जमादिलावल

१२००० पंढरपुरास स्वारी गेली सा। खर्च जाला छ २६ जमादिलावल

[3-7-1810

इहिदे अशर मयातेन जमादिलावल ऊर्फ जेष्ठ

२०७ सातारियास छत्रपतीजवळ आमचे ४ हुजरे व रायगडास यश्वदाबाईजवळ ४ हुजरे आहेत त्यास तैनातेबा। छ ३० जमादिलावल

[21-10-1810

इहिदे अशेर मयातेन माहे रमजान ऊर्फ अश्विन

९०० पुत्रजन्मानिमित्य खैरात खर्च जाहाले छ २१ रमजान

[3-11-1810

इहिदे अशर सवाल ऊर्फ कार्तिक

२१७७ चिरंजीव राजश्री वामनराव यांचे बारशानिमित्य दोन हजार येकसे सत्याहत्तर रु. खर्च केला छ ५ सवाल

[23-1-1811

इहिदे अशर मयातेन पौष जिल्हेज

२५००० बुधवारचे वाड्याचे तयारी बा। खर्च केले छ २७ जिल्हेज

---

No. 280] [26-1-1811

इहिदे अशर मयातेन पौष जिल्हेज

३०००० माधवरावसाहेब यांची स्त्री यशदाबाई पौष वद्य पंचमीस सालमजकुरी मृत्यु पावली यांचे उत्तरकार्याबद्दल खर्च जाहाले छ ३० जिल्हेज

[11-2-1811

इहिदे अशर मयातेन मोहरम माघ

१६०५ माघ वा। १ पावेतो चिरंजीव राजश्री वामनराव अण्णा याचे प्रक्रुतीस आरोग्यार्थ अनुष्ठानास दक्षणा दिल्ही छ १६ मोहरम

[6-3-1811

इहिदे अशर मयातेन सफर फाल्गुन

४२०० उतम लढवाई दारूचे बाण ६०० तयार करण्याकरता पानशाला दिले छ १० सफर

[26-3-1811

इहिदे अशर मयातेन रबिलावल ऊर्फ चैत्र

१७००० हिंगणीस तीर्थरूप कै. दादासाहेब यांचा काल जाहाला; तेथे पश्चमेकडील तटाचे भिंतीचे पायास येकंदर २२००० रुा लागले पैकी हे त्रिंबकजीकडून देविले. पेशजी ५००० देविले होते छ १ रबिलावल.

No. 281] [14-3-1735

२

श्रीचिंतामण.

यादीदास्त करिने सन हजार ११४४ अखेरी शके १६५७ चैत्र सुध १ सुक्रवार नवे साल राक्षसनाम संवछरे. चैत्र सुध येकादसीस सोमवारी श्रीच्या नाताच्या दोघाच्या मुंजीची लग्ने. कल्याण मुंजीस पाठविला असे. पुणियात येच तिथीस खंडो विसाजी व बाजी शंकर व बाजी कान्हो व पांडुरंग नारायेण त्यांच्या मुलांच्या मुंजी जाल्या असेत. १.

---

No. 282] [24-3-1735

सुध १२ सोमवारी राजश्री चिमाजीआपास राजश्री पंताचे पत्र कुलाबातून आले की येथें संभाजी आंगरियाकडून रघुनाथजी आला होता. याजकरिता सात आठ रोज मुकाम जाला होता. याउपरी आम्ही राजमाचीस येतो. तुम्हीहि राजमाचीस येणे. त्याजवरून ते व बालाजी बाजीराऊ यैसे तिसरे प्रहरी स्वार होऊन गेले असेत. १.

---

No. 283] [2-4-1735

चैत्र वद्ये ६ बुधवारी तिसरे प्रहरी राजश्री प्रधानपंत व राजश्री आपा व माहादोबा व बापूजीपंतनाना यैसे चिंचवडावरून तळेगावीहून पुणियास आले. कुलाबियाकडे गेले होते ते स्वारी करून राजमाची कोथळा मानाजी आंगरियापासून देखील किलियाचा सरंजाम घेऊन राजमाचियाहून घरास आले असेत. माहादोबा येथून रात्रौ सातारियास गेले असेत. १.

चैत्र वद्ये ११

राजश्री पंत अपानी आठेक दिवस जाले दिवटियास ताकीद केली की दिवट्या दोन च्यार लावीत जा. हशम वगैरे लोक कारखानियावरी आहेत त्याणी समेत हत्यारे घेऊन, मजुरा धजेने करून, पटी विडियाची घ्यावी. यैसी आंगरियाचे पधतीप्रा पधती घातली असे. १.

---

१ 'श्रीचिंतामण' या श्रीकारावरून अनुमान होतें कीं चिंचवडच्या देवांकडे अशी एखादी रोजनिशी होती. पुढील उतारे त्या रुमालांतील आहेत.

No. 284] [14-4-1735

सुध त्रितीयेस औरंगाबाजेहून बातमी आली की मल्हारजी होलकर राणोजी सिंदे याच्या व खानदौराच्या भेटी जाल्या. यैसे तहकीक वर्तमान असे. १.

---

No. 285] [22-4-1735

वैशाख सुध ११ मंगळवारी राजश्री पिलाजी जाधव याचा धाकटा लेक चांगोजी, संभाजी जाधवास दिल्हा आहे, त्याचे लग्न गोरेजे जाले. जेऊरच्या पाटिलासी सोयेरीक केली. संभाजी जाधवच होते. पिलाजी जाधव लस्करात होते. गोविंदराऊ येशवंतराऊ लग्नास गेले. कल्याण निलकंठहि गेले. खंडेरायाकडीलहि आहेर कल्याणपंतात्रा पाठविला असे. १.

जाधवाचा हाती जातेसमई कोरेगावीचे मुकामी वारला. १.

---

No. 286] [30-4-1735

वैशाख वद्ये ५ बुधवारी रात्री राजश्री बापूजीपंत नाना यांणी शामराऊ भाचे याचा पुत्र घेऊन नांव श्रीपतराऊ ठेविले. गतवरसी त्यांचे लग्न जाले. पेडगावी सोयेरीक, पेडगावीच्या किलेदाराचे दिवाण, त्याचे नाव [कोरी जागा] त्यांसी केली. संभाजी जाधवाच्या लग्नास गेले होते देसमुख देसपांडिये ते जेऊरीहूनच पेडगावास लग्नास आले. १.

---

No. 287] [6-5-1735

वैशाख वद्ये ११ मंगळवारीं रात्री मल्हारबा देसमुख यांचे मुलीचे लग्न लागले. सोयेरीक वांगणीचे देसमुख घारे यासी केली. [कोरी जागा].

---

No. 288] [6-6-1735

राजश्री फतेसिंगबावांचे पत्रे आले की घरात ज्वर येत आहे, तरी सतबा येसवंतराऊ यैसे लौकर येणें. त्याजवरून येथून कल्याणराऊ व येशवंतराऊ

नायेगावास पाठविले. तेथे सतबा व गोविंदराऊ ढमालियाच्या लग्नास गेले होते ते यैसे सातारियास गेले. राजश्री स्वामी पंढरीचे यात्रेस गेले. त्याजबरोबर हेहि गेले असेत. १.

---

*No. 289*]

जेस्ट वद्ये राजश्री दादोबा पुरंदरे पुणियास आले. आठ दिवस राहून पंढरीचे यात्रेस गेले असेत. १.

---

*No. 290*] [*12-6-1735*

आश्याढ सुध त्रितीया गुरुवारी राजश्री चिमाजीआपा व बालाजी बाजीराऊ यैसे माहाराज राजश्री स्वामी * * पंढरपूरचे यात्रेस जावयास गेले असेत. १.

---

*No. 291*]

होल करंजे येथील सिवेच्या कजियानिमित्ये सिवरामभट चित्राव याणी नागेशाचे देऊल सन पंचेतालीसमधे बांधले. पेसवियानी साहित्य केले असे. १.

---

*No. 292*] [*28-6-1735*

आश्याढ वद्ये ४ सुक्रवारी राजश्री पंतप्रधान यांणी राजश्री सिवाजी राजे यांचा लालमाहाल राजश्री दादाजी कोंडदेऊ याणी राजश्री शाहाजी राजे याचे कारकीर्दीस बांधला होता. त्यांचे भाऊ राजश्री संभाजी राजे सिवाजी राजे याचे भाऊ त्याचा माहाल वेदमूर्ती राजश्री खंडभट शालेग्राम याच्या वाडियापावेतो होता. त्याचे जोते उतरामुख होते. ते उखलून चिरे कारंजियापासी घर बांधले त्याजला जोतियास नेले. राजश्रीच्या माहालावरहि येक दोन घरे बांधोन आवदार (?) वाडा करून ठेवावा. तूर्त येक दोन घरे बांधावी. माहलात नेहमी घरे होऊन जागा निर्मल राहील आणि तूर्त राजश्री राणोजी सिंदे व रामचंद्रजीस घरे राहवयास होतील म्हणून पंती लालमाहाल बांधावयाची तजवीज केली. आठपधरां रोज जाले. जुना हौद कारंजियाचा पका आहे त्या वरती पछेमेकडे दिवाणखाना जुना होता तेथे घर बांधिले. त्यास यांची साधत नाही म्हणून त्या दिवाणखानियाची जुनी कांहीबांही भिंताडे होती ते धोंडे

2568

काहडून आपल्या वाडियाच्या सुताने दोरी धरून प्रांची साधून कारंजियाचा सुमार टाकून तूर्त येक घर कारंजियाच्या कोनासी दक्षणेकडल्या लाऊन (?) केले होता, मुळें हे कारंजे रद जाले असे. देसपांडियाच्या पछेमेस खंडभटाचें दक्षणेंस जे जागा आहे ते माहालची आहे. खंडभटाच्या दक्षण भिंतीपासी चिरेबंदी जोते माहालचे होते ते आजी पंती उखळून चिरें हऊदाकडे नेऊन तूर्त घर बांधतात. त्याच्या जोतियास लाविले असेत. लालमाहलचा वगैरे दोन यैसे तीन आठ पंती गाडले होते ते उकरिले. पाणी लागले. मऱ्हामती तोडाची केली असे. लालमाहालची जमीन पछेमेसहि कांही गेली असावीसी आहे. तूर्त जोते काहडलियाने माहालचे हादेचे हिंदाण मोडले; परंतु ते जागा माहालची असे.

---

*No. 293]* *[6-7-1735*

आश्याढ वद्ये १२ रविवारी राजश्री मल्हारजी होलकर व राणोजी सिंदे आले. राजश्री पंत होलकरास संगमापावेतो व सिंदियास घोरपडीपावेतो सामोरे गेले होते. उभयेतानी खानदवरा बकसी व जयेसिंग सवाई यासी लढाई केली. सेवटी सला केला. फते करून आले असेत. मालवियात तह केला आहे. कागदी पत्री तहकीक आसेल यैसे असे. होलकर पाटिलाचे इनामकीत पली कडले साली हवेली बांधली तेथे राहिले. सिंदियास हली नवे घर लालमाहाल जुना त्यामधें बांधले तेथे राहणार.

---

*No. 294]* *[24-7-1735*

श्रावण सुध २ गुरुवारी दिवसा तिसरे प्रहरी राजश्री बाजीराऊ प्रधान यास कासीबाईचे पोटी पुत्र जाला. वितिपात लागला होता उछाहा केला. हतीवर साखर घालून वाटली. किरकोली बंदवान होते ते सोडिले. ब्राम्हण बारा रुकियाप्रा दक्षणा दिल्ही असे. बारावे दिवसी बारसे केले. अर्धा रुपयाप्रा ब्रा दक्षणा दिल्ही. जनार्दन नाव ठेविले. समाईक देसमुख देसपांडे यानी अहेर केला असे.

---

*No. 295]* *[14-7-1735*

श्रावण सुध ६ शेस्टी सोमवारी मुजेरीचे झांबरे पाटील याणीं पेसवियास पैका देऊं केला. त्या हिमाहितीने सिरालसेट बाजाराने नेऊन सेखसलाहच्या खिडकीने नदीत टाकिला. वरसास गोविंदजी देसमुखाच्या वाड्यावरून गंजीने नेत असेत.

2569

येंदा सेटियाचे बाजारे नेला. मागे कधी बाजारे नेला नव्हता. सेटियावर जुलूम जाला. नवगडधा होतो म्हणून सांगावयासहि आले होते. १

रखमाजी बिन मालजी पाा सस्ते व मानाई पाटलीण यैसी सांगावयास रोज मजकुरी आली की आपण वडील. पहिल्यापासून येक सिरलसेट घालीत असो. आपण हली माणकोजी पाा सस्ता दोन तीन वरसे आपले घरींहि सिरालसेट घालू लागला. नको म्हणलियाने यैकत नाही. दोने साली जमीदाराचा कागदहि नेला; परंतु मानीत नाहीत. ते घालितात. दोन चालत आले आहेत यैसा पायेंडा पडेल याजकरिता गेले साली व येंदा आपण घातला नाहीं. काला मालजी पाा सस्ता तोहि आपले घरी सिरालसेट करितो; यैसे छंद करितात म्हणून सांगत आले असेत. माणकोजी मालजीहि आले. सिरालसेट वृद्धीमुले घातले नाहीत. पुढे येकच सिरालसेट घालावा छंद करू नये यैसे करून गेले असेत. शाहाजी पाटीलहि आले असेत १

राजश्री पंतप्रधान यांणी ब्राम्हणांस दक्षणां दिल्ही. श्रावणमासचे ब्राम्हण जमा जाले होते त्यास तीन साली तीन हजार ब्राा आले. रुपया दोन तीन च्यार पाच दाहा बारा अर्धा लाहणा मुलास यैसे दिल्हे रुपये

---

*No. 296]* *[20-7-1735*

श्रावण सुध द्वादसी रविवारी राजश्री चिमाजीआपा राजश्रीबाा पंढरीचे यात्रेस गेले होते ते, गावास राजश्री बाजीरायांच्या पुत्राचे बारसे करावयास आले. त्यास सामोरे राजश्री राऊ व मल्हारजी व्होलकर व राणोजी सिंदे वगैरे अवघेजण धरणावरते गेले होते. दुसरे दिवसी बारसे केले. १

---

*No. 297]* *[24-7-1735*

श्रावण वद्य प्रतिपदेस गुरुवार राजश्री गोविंदराऊ व संतबा व येशवंतराऊ देशमुख व कल्याणराऊ व अपाजी मल्हार सौ गोदूबाईस बरे वाटत नवते म्हणून राजश्री फतेसिंगबावानी बोलाऊन नेले होते ते गावास आले. १

---

*No. 298]* *[29-7-1735*

वद्य शेष्टी मगलवारी कोथरूडचा न्हावी मेला. पाटील वेसीतून मूठमाती द्यावयास नेऊ देईना. म्हणून त्याचा भाऊ गंगा सांगावयास आला. पुणेकरहि न्हावी आले. त्याजवरून देसमुख देसपांडिये याच्या नांवे पत्र कोथरूडकरास दिल्हे

की, कौल जालियावरी लोणी कालभर येथील पाटिलानी न्हावी यास वेसीतून न न्यावे म्हणून अटक केली. राजश्री पंतप्रधान याजपासी मजकूर पडिला· त्याणी जागाजागाचे दाखले आणिले. न्हावीयास सुखरूप वेसींतून न्यावे यैसे जाले. तुम्ही कटकट न करणे यैसे दिल्हे असे.

---

*No. 299]* *[27-7-1735*

वद्य ४ रविवारी सुभानजी पाटील ठाकूर व येमाजी पाटील पारखी मौजे माण यांणी आबाजी चतूर न्हावी चांदी याचा भाऊ हाती धरून नेला. तेथील न्हावी बुडाला, तो चतूर होता. त्यास कौल जालियावरी गावास न्हावी पाहिजे म्हणून आबाजीस त्यांणी ठेविले. बापूजी पाटील ठाकूर याचे राजश्री अंताजीपंत दादा पासून बोलोन केले की, आमचा न्हावी बुडाला. आम्हास न्हावी द्या. आणि सांगितले की, तुमचा न्हावी बुडाला. त्याचे आडनाव चतूर होते. तरी आबाजी चतूर पुणकर आहे; याचे हाते काम घेणे. त्याणी हाती धरून नेला. पंधरा सोला वरसे काम घेतले. मिरासपटीहि घेतली. यैसे असता, साल मजकुरी राक्षसी याकडे लस्करचे चाकरीचा न्हावी होता, त्याजकडून काम घेऊ लागले. याजकरिता आबाजी येथे आला. येथून देसमूख देसपांडिये यांच्या नावे पत्र पाठऊन बोलाऊन आणिले. येथे आलियावरी आबाजीस हाती धरून घेऊन गेले, की याचे हाते कामकाज घेऊ. याखेरीज दुसरा न्हावी करीत नाही. तूर्त त्या न्हावियाने कामकाज केले असे. येव्हडे च्यार महिने गेलियावरी याचा हा आहेच. याचे हाते पांढरीचे कामकाज घेऊन. यैस जाले असे.

---

*No. 300]* *[30-7-1735*

वद्य सप्तमी बुधवारी आनंदराऊ सुमंत व त्याचे पुत्र कृष्णराऊ वगैरे व रघुनाथभट यैसे भागानगरीहून निजामनमुल्क याजकडून आले. सातारियास जाणार. गेले असेत. १

---

*No. 301]* *[August 1735*

भाद्रपद सुध

राजश्री बाजीराऊ सातारियास गेले. राजश्रीनी बोलाऊ पाठविले होते याज-निमित्ये गेले असेत.

राणोजी सिंदियानी पासणाच्या सिंवेचा प्रसंग राजश्री चिमाजीआपासी केला. त्याणी जगोबास बोलाऊन कजिया सांगा म्हणून लष्ट लाविले. याणी उदंड

पड घेतली; परंतु ऐकत नाहीत. पेसवे आहेत हेच वाद सांगो लागले. तेव्हा कोणे भांडावे? म्हणून तुम्हीच समर्थ आहा; तुम्ही सांगाल ते आइकों म्हणून बोलिले. ते चितास न ये; तैसे केले तरी दिवाणदारीने केलेसे पुढे दिसोन येईल; याजकरिता तुम्ही पाचास राजी होणे तरी औधकरानी दिव्ये करावे म्हटले. ते म्हणतात दिव्ये देत नाही. पाचास राजी व्हा नाही तरी अमच्या चितास येईल तैसे करू यैसे दबाऊ लागले. औधकराचा पक्ष करीत म्हणून सारे देसमुख व जगोबा वगैरे भाऊ राणोजी सिंदियाकडे गेले की तुजला काये करणे असेल अगर घेणे असेल ते घे; परंतु अम्हास पेसवियापासी फजीत करू नको. त्याणें वस्त्रें देऊन वाटे लाविले. बरे तुम्ही आम्ही मागेच समजलो असतो. परंतु लांबत लांबत आले यैसे म्हटले. दुसरे रोजी मागती गेलो, तो राणबा आपाकडे जाऊन तेथे बोलाऊन नेऊन मागती त्यांजकडून रुईस पेंडवळा न्यावयाच्या गोष्टी सांगो लागले. मग येकांती आपासी बापूजी श्रीपत यांच्या विद्येमाने उदंड सांगितले; परंतु औंधकरास दिव्ये देत नाही यैसे म्हणेत. तुम्ही पाचांस राजी व्हा. आनीक पांचजण तुम्हास पेचंतील (?) ऐसे देऊ त्यांस राजी होणें. याणीं सागितले की दांडोगाने सेते पाडली ती मोकली करा. जुनी जमीन कजियाची आहे तीस मग पाचास राजी होऊं अगर ज्यास स्वामी म्हणतील त्यास राजी होऊ. तरी ते मोकले करीत नाही ऐसी अग्राहाचीच गोष्टी सांगत. समर्थासी वावगी मरजीखेरीज बोली करिता नये; न करावी. तेव्हा त्याचें यैकावे तरी रुईस पेंडवला नेतील यैसे संकट जाले. कालावर द्रस्टी देऊन मर्जीसारिखे वर्ता यैसेहि भुलोजी पाटील सांगत. सेवटी पाचांस राजी होणे. पाचापासी बेडागाचा अर्थ सांगणे. ते विचारून करणें ते करतील यैसे म्हणतात. औंधकरानी सिवेचा कागद काहाडला तो पाहिला. बाजी कान्हो यादोपंत देवजीपंत जगोबानाना रंगोपंत मोरोबा अपा रामभट यैसे होते त्रिंबकजी राणवडा गुणाजी चौ नागोपंत कुलकर्णी पाहिला. सांत बंद निरनिराले आहेत. सा पाठीमागे कोरे आहेत. सातवियाच्या पाठीवर मजकूर आला अहे. जोडगीर केली नाही. बावना वरसाचा कागद अहे. देसमुखाचा सिका नाही. खासनिसांच्या हातचे दस्तक नाही. दस्तक वडिलाचे चालीप्रमाणे नाही. गोविंदराऊ येसवंतराऊ देसमुख म्हणून लिा आहे. देसपांडियाचे दस्तक नाही. रामाजी गोविंदाचे दस्तुर कागद म्हणतात. देवावरील बेल रखमाजी राणवडियाने काहाडून दिल्हा की निंबसेत पैकी इनामत आपली, हे सेत आमचे म्हणून रामजी सितोला याच्या हातावर दिल्हा; परंतु अमके रोजी दिल्हा ऐसी तेरीख घातेली नाही.

जागा टाकिली आहे. वलीस दाहापंधरा रोज जाले. कीर्द लागली नाही. म्हणून लिा; परंतु तागाईतेस जागा टाकला आहे. तेरीख घातली नाही. कचा कागद आहे. बाणेरकर बोपडेकर याची नांवे हजी(र) मज्यालसीस आहेत.

म्हटला आहे; परंतु हदमहदुद लिहिली नाही. मागे तानदेवाने द्रोही दिल्ही वाहू दिल्हे नाही त्याजवर रामजीने द्रोही दिल्ही वाहऊ दिल्हे यैसे औंधकराचे तकरीरेत त्या कागदात लिा आहे; तेव्हा सेभर वरसेपावेतो भोगवटा नाही ऐसे अर्थ आला आहे. नागरसाने साक्ष दिल्ही आहे की आपण इनामत वाहिली त्याची उमर साठी वरसे घातली असे. संतोजी मुरकुटा याची उमर लिा नाही. त्याणी म्हटले की आपला आजा कालोजी त्याणे वाहिली होती याप्रां कागद आहे. पासणेकरानी लिा आपणात बुनादी कोण्ही नाही असे आहे. औधकरानी सिवे-वर माल घेतली नाही. बेल मात्र देवावरून दिल्हा ऐसे लिा आहे. कागद रामाजी गोविंदाने करून दिल्हा आहे. देसमुखा हुजूर जाला नाही. देसमुखाची पाटिलकी पासणांची म्हणून अदावतीने दिल्हा असे यैसे भासते.

राणोजी सिंदे औधास गेले होते ते येऊन पाटसास गेले. औधास मोरोपंत आपा खंडो विसाजी राणोजीकडे गेले. उदंड बोध केला की तुम्ही नाहक चौलाऊ नका; परंतु यैकिले नाही. राणोजीचा आग्रह हाच आहे की पेसवि-याच्या हिमायेतीने सींव रेटावी. पासणाची सेत घ्यावी यैसे आहे.

---

*No. 302]* *[6-9-1735*

आस्विन सुध प्रतिपदा पाचसातारोजाची खबर आली की किले माहोली मोगलाकडे होती ते भेद करून पेसवियाच्या लोकानी घेतली. किला सर जाला. शंकराजी केशव व कर्णोजी सिंदे वगैरे हशाम जाऊन किला घेतला. येथून सरंजाम वरचेवर लोक वगैरे पाठविला असे. माहोलीच्या मोगलाकडे कर्णाला असे. माहोली गेली हाहि किला घेतील म्हणून त्याणे हबसियास लेहून त्याचे दोनसे माणूस आणिले. गनिमाची अडचण जाली तरी हबसियास किला द्यावा याजनिमित्ये हबसियाचे लोक आणिले. सेवटी पेसवियाची पत्रे कर्णालकरास गेली की तुम्ही हबसियास किला दिल्हा म्हणजे आम्ही वेढा घालू. तुमचा तुम्हाकडे असलियाने आम्ही वाटे जात नाही. त्याजवरून त्याणे हबसियाच्या लोकास निरोप दिल्हा असे. १

No. 303] [15-9-173७

आस्वीन सुध १० दसमी सोमवारी दसरियाचे दिवसी राजश्री आनंदराऊ सोमवंसी याचे सरलस्कर काहाडून त्रिंबकराऊ सोमवंसी देवजीचा पुत्र याजला सरलस्कर दिल्हे. आनंदराऊ बेवकूफ याजमुळे काहाडले असे. बीड अंबाड येथील सचिवांच्या बाबती सचिवानी अलाहिदा केल्या.

---

No. 304] [22-9-1735

आस्विन वद्य ३ सोमवारी दिढा प्रहरा दिवसा सकाळच्या राजश्री पंतप्रधान आले. सातारियाहून जेजुरीस आले. तेथून कुरकुंबास गेले. तेथून गारेस भीमेस ग्रहणास जाऊन पाटसावरून आले असेत. १

---

No. 305] [23-9-1735

आस्विन वद्य ३ मगलवार दमाजी थोरात याणी कोलवडीची तिसरी तकसीम पाटिलकी घेऊन महजर करून घेतले. त्याजवरी कसाला जाले. कागदपत्र गेले. याजकरिता त्याचे पुत्र खंडोजी थोरात याणी पिलाजी जाधव याच्या हाते प्रसंग करून पेसवियाचे तिसरे तकसिमेचे मोकदमीचे दुमालेपत्र करून घेतले. शेरणी अडीच हजार रुा करार करून चौशाचा निला घोडा दिल्हा. पिलाजी जाधव याजकडून सासे रुपये आपले चाकरीचे यैवजी देविले. बाकी दीडहजार सन सेतालीसापासून ती सालात द्यावे. वरसास पाचसे याप्रां कतबा लेहून दिल्हा. दुमाले पत्रे मोघम (?) पूर्ववतप्रा तिसरी तकसीम अनभवणे. यैसी व साहित्यें पत्रें दिल्ही असेत. १

---

No. 306] [8-10-1735

कार्तिक सुध ४ बुधवार

राजश्री पंतप्रधान आस्विन वद्य १३ प्रस्थान करून बाबूजी नाईकाचेथे जाऊन राहिले. आजी मूहूर्ते करून पल्याड जाऊन डेरे देऊन राहिले. मावलातून स्वारीस जाले. चारा पाणी मावलात आहे ते वाटेने जाणार. बराबर पुत्रास नेणार.

रोज मजकुरी हवेली सांडसचे पाटील पेसवियाकडे पाऊस गेला याजकरिता बापूजीपंती नेले. पंतानी समाधान करून सांगितले की मावलातून कोकणातून

दाणे आणाल त्यास जकात घेऊ ना. गुरे चारणीस न्याल त्यास वणचराई लाऊ देऊ ना. हजीर जेव (?) घेऊ देऊ ना. पाऊस पाणी पडोन काहीं जाले तरी घेऊ नाही तरी काही घेऊ ना. यैसे समाधान करून स्वारीस गेले असेत.

रोज मजकुरी बुरूड व चांभार प्रांत जुनर व पुणे यांचा कजिया होता. चांभार म्हणत आपण बुरुडाचे पायेपोस जुने सालाबाद सादीत नाही. बुरुड म्हणतांत सांदीत आले. दाखले पाहता बुरडाचे जुने पायेपोस चांभार सांदीत आले यैसे पुरत नाहीत. त्याजवरून पेसवियाने तह केला की देसच्या चांभारानी बुरडाचे जुने पायेपोस सांदू नयेत. मावलचे व कोकणचे व इंदुस्थानचे चांभार आहेत त्याणी बुरडाचे पायेपोस सांदावे. यैसे वर्तावे म्हणून तुकोजी पिंपला बुरुड जुनरकर व पेंढार पिंपरियाचा बहरजी सोनवणी बुरूड पुणेकर याचा कतबा दिवाणांत गोपाळरायाच्या हाते लेहून घेतला असे. चांभारास पत्रे पेसवियानी करू दिल्ही की तुम्ही बुरडाचे पाये(पो)स मागे सांदिले नाहीत पुढेहि न सांदणे. चांभारापासून साल गुाच्या गावच्या वसुलावर सेकडा साडेसात रुपये पुणे देसी घेतले असेत. पाटिलाचे कतबे चांभाराच्या पैकियाचे उगवणीचे घेतले असेत. पुणाचे चांभार पैका फार पडला म्हणून वाघोलीस पळोन गेले असेत. खोडदापावेतो लस्कराबराबर चाभार गेले होते.

राजश्री पंतप्रधान खोडदचे मुकामीहून स्वार होऊन पुढे गेले. पिलाजी जाधव यास राजश्री स्वामीनी बोलाविले याजकरिता सातारियास गेलेसे. चिमाजीआपा जुनर प्रांते तहरह करावयास राहिले. बाजी भिवराऊ यांस पिलाजी जाधव मुतालकी करून फौज घेऊन जात असेत ते मुतालकी सांगोन ते फौज बराबर देऊन बराबर नेले. रावेंतच्या बरवाजी पाटिलासी येमाजी भोंडवा भांडत होता. कान्होजी झेंडा राजश्री पंतप्रधान याजपासी करोल चाकर आहे. त्यांणी येमाजीसी मिलोन कजिया फैलाविला. पंती भोवरगाऊ पाढर नेऊन मनास आणिला. साक्ष बरवाजी सारिखी जाली. कान्होजीचा कोठे दाखला पुरला नाही. कल्याणराऊ व बाजी कान्हो देसमुखीच्या कारभारास गेले होते. गोपाल रामहि होते. भुलोजी पाटील ढमढेरेहि इनसाफास होते. बापूजीपंत नानाहि होते. कान्होजीचा पाटिलकीत दाखलादुखला लागला नाही. कान्होजी पंताबराबर स्वारीस गेला. बरवाजीपासून च्यारसे रुा उगेच नजर घेतले. येणेप्रा जाले असे. बापूजीपंत भिमाशंकरास जाऊन पुणियास आले असेत. कार्तिकमासी पासणे लौले येथे संतबाचे कुरण आहे त्यासी मल्हारबानी आडथला गवतासाठी केला. १

चिमाजीआपा रामचद्र माहादेव याच्या पुत्राच्या लंग्नास आले. त्याणे सोयेरीक शंकराजी केशव यासी केली. चिमाजीआपाची फौज रामचद्र हरि यैसे माहाळुंगे येथे ठेविले आसेत. जुनरच्या उरावर गढी बांधावयास काम लाविले. मोगलहि जमाव करू लागला. गढीचे काम च्यार दिवस राहविले असे. १

मातुश्री लाडूबाईनीहि सतबासी पासणियात आम्ही गवत काहाडू म्हणून कटकट लाविली असे.

---

*No. 307]* *[5-12-1735*

पौश सुध द्वितीया त्रितीया या दिवसात बाणकोट पेसवियाकडे होता तो हबसियानी गलबते आणून मार करून घेतला असे. हरि गणेश सरदार धरून नेले. जखमी आहेत. माणूस पडलेहि फार; बाणकोट जबून जागा. राखवत नाही म्हणून हबसियानी पाडावयास काम लाविला. माहाडात राजश्रीचे ठाणे; याजकरिता येथून चिमाजीआपानी माहाडचे बंदोबस्तीस बरखंदाज पाठविले असेत. १

पेसवियानी मांडवगड मालवियातीस (ल?) येथील सरदेसमुखी व सरदेसपांडेपण निमे घेतले. पैठणचे निमे पैकी निमे देसपांडेपण रुपुराऊ (?) यापासून घेतले असे. १

---

*No. 308]* *[11-12-1735*

पिलाजी जाधव सातारियांत होते. बाणकोट गेला. आणीख किले दगावतील याजकरितां राजश्रीनी चिमाजीआपाकडे पाठविले की तुम्ही सारे फौज घेऊन कोकणात उतरा. त्याजवरून पिलाजी जाधव पौश सुध गुरुवारी सुक्रवारी येथे आले. येथून नांदेडियास गेले. पुढें राऊत घेऊन कोकणात जाणार. १

---

*No. 309]* *[27-12-1735*

पौश वद्य १० दसमीस नारबावा व सेखमिरा व दादोबा आले चिमाजी आपास बाणकोटास पाठवावयास. चिमाजीआपा गेले नाहीत. पिलाजी जाधव यासच पाठवावयाची तजवीज केली. द्वादसीस उठोन गेले. माहादाजी अंबाजीहि गेले असेत. सैदलस्करखान अवरंगाबादेहून मखबूल अलमाचे कुमकेस येत होते. टोकियावर आले मागती फिरोन गेले. बाजी (हाजी ?) कोतवाल शेहरचा वारला हेहि वर्तमान असे.

No. 310] [11-1-1736

माघ सुध ९ रविवारी जगोबा व खंडो विसाजी राजश्री स्वामीकडे गेले. आधले दिवसी राजश्री चिमाजीआपा गेले होते. सिवापुरी राहिले होते. ते व हे असे सिरवलावरी गेले. गोविंदराऊ सतंबा येसवंतराऊ कल्याणराऊ आपा यैसे सिरवलावर आले. राजश्री स्वामीचा मुकाम नायेगांऊ ताा सिरवल येथे होता. तेथेच चिमाजीआपाबराबर जाऊन राजदर्शन केले. येकादसीस मागती राजश्री सिरवलास आले. त्याजबराबर आले. द्वादसीस हरगुडे येथे आले. तेथून जेजुरीस आले. दोनतीन मुकाम होते. तेथून सासवडी मुकाम केला. सासवडीहून सिवापूरास आले. चार पाच मुकाम केले. सेवटी कूच करून सिरवलास गेले. तेथून कूच करून वाईवर गेले. सिवापूरचे मुकामीहून चिमाजीआपानी निरोप घेतला. मुंज पुत्राची करावयास पुणियास आले. देसमुख देसपांडेहि आले. माघ वद्य दसमी सोमवारी पुणियास आले. राजश्री तिकडे गेले.

माघ सुध नवमी दसमीस राजश्री पंत सचिव याची मातुश्री यास देवआज्ञा जाली. सचिव नायेगांवीहून राजश्रीची आज्ञा घेऊन गेले असेत.

---

No. 311] [12-2-1736

फाल्गुण सुध १२ द्वादसी गुरुवारी राजश्री चिमाजीआपाचे पुत्र सदोबा याचा वृतबंध जाला. समारंभ बरा जाला. श्रीदेव चिंचवड मुंजीस आले होते. लालमाहलात ब्राह्मणभोजनाचे मांडव घातले होते. फाल्गुण वाा २ देकार दिल्हा. वीस पंचवीस हजार रुा वाटला. फार धर्म केला.

होली जालियावरी दुसरे रोजी पाटिलाचे खेले सेटीयाच्या होलीवरुनी गेले म्हणून सेटियानी चिमाजीआपास सांगितले. त्याणी पाटिलास ताकीद केली की त्याच्या बाजारे खेले घेऊन न जाणे. वरसास जे वाटेने जात असाल ते वाटेने जाणे. असे जाले असे.

---

No. 312] [10-3-1736

श्री

करिने सके १६५८ नलनाम सवछरे चैत्र सुध १ प्रतिपदा मगलवार सुहुर सन सीत सलासीन मयां अलफ. सन ११४५.

चैत्र सुध नवमीस राजश्री आपा राजश्री कृष्णराऊ माहादेव याचेथे त्याच्या मुलाची मुंज दसमीची म्हणून चासेस गेले. १

No. 313] [15-3-1736

चैत्र सुा १४ गावास आले. पूर्णमेस चद्रग्रहण, दिवस उगवता पूर्णमा आसे. १

दादोबा व सेखमिरा राजश्री आपास बोलाऊ पाठविले, सबब की संभाजी राजियाचा व घोरपडियाचा बिघाड जाला. पेसवियानी मेहुणा वेंकटराऊ घोरपडे याजनिमित्ये त्याच्या ठाणियाची कुमक केली; यामुले संभाजी राजे याणी राजश्री स्वामीस लिहिले की तुमच्या राज्यातून कुमक होऊ लागली; याउपरी आम्ही मोगलापाशी तऱ्ही कुमक मागावी. त्याजवरून राजश्रीनी विचार केला की सरकारकून पाठऊन संभाजी राजियास भेटीस आणावे; समाधान करावे. यानिमित्ये आपास बोलाविले जाणार. आपा चासेस गेले, ते दिवसी बालाजी बाजीराऊ व माहादाजी अंबाजी थैसे सातारियास पाठविले. चिमाजीआपा चासेहून पुणियास येता माणकोजी पिंपलेकर पुढे जाऊन आपास गावास घेऊन येऊन धडफलियाचे टाके सेत दाखविले आसे. इनाम चालू नये म्हणून नालिसीच्या गोस्टी सागितल्या आसेत. १

सिपारसी बाबूजी नाईकाचा गुमास्ता सिऊबा नाईक आफटा केला असे वगैरे.

---

No. 314] [20-3-1736

चैत्र वद्ये ९ मंदवारी राजश्री चिमाजीआपा स्वार होऊन सातारियास गेले. आगोधर येक दिवस वासदेव जोशी याचेथे परस्थाने राहिले. तेथून दोन रोज बागात राहिले. मंदवारी स्वार होऊन गेले. १

---

No. 315] [28-3-1736

चैत्र वद्ये १३ रविवारी प्रहर दिढा प्रहरा दिवसा दादजी चिटनीस राजश्री प्रधानपंताचे यास क्षयेरोग होता मृत्ये पावले असेत. १

अवजी नीलकंठ परभू नील परभूचे पुत्र त्यास दादजी म्हणत असेत. कोटात घर बाधोन राहतात. तेथेच देहअवसान जाले.

---

No. 316] [3-4-1736

वैशाख सुध ३ त्रितीयेस पारवाडियात कुणबियाची पोर आडचा वरसाची गरोदर जाली म्हणोन वर्तमान आले. त्याजवरून ती मूल येथे आणविली. पेसवियांच्या कारभारियानी ते अवघ्या गावानी पाहिली. खरेसे असे. परिणाम काये होईल ते पाहावे.

*No. 317*] [*2-4-1736*

वैशाख सुध २ शुक्रवारी कान्होजी पा झांबरा लब्या याचा भाऊ बावाजी, त्र्यंबकराऊ विस्वनाथ याजबराबर चाकरीस बागलाणात गेला होता तो येका गांवावर जुंझी पडिला म्हणून खबर आली. याजकरिता त्याची बायेको मांडऱ्याची लेक सती निघाली; संगमी सती पडली. १

---

*No. 318*] [*7-4-1736*

वैशाख सुध ७ बुधवारी खबर आली की मल्हारजी पा झांबरा वेंकोजी पाचा लेक गोरखोजी भापकर याजबराबर चाकरीस गेला होता. तो मेला. बारा रोज जाले. जखम लागोन मेला असे. १

---

*No. 319*] [*6-4-1736*

वैशाख सुध ६ सह सप्तमी मंगलवारी अवसीच्या दाहा घटका रात्री आनंदराऊ बहिरव दिा राजश्री पंतसचिव सिंहगडी होते तेथे देवआज्ञा जाली असे. १

---

*No. 320*] [*15-4-1736*

वैशाख वद्ये गुरुवारी राजश्री चिमाजीआपा सातारियाहून येऊन नांदेडिया-पलीकडे भुगाऊ भुकूम येथे मुकाम करून राहिले. दुसरे रोजी कूच करून कुलाबियाकडे गेले. सबब की रेवसे म्हणून जागा आहे ते मानाजी आंगरियाकडे होती; ते हाबसियानी घेतली. मानाजीची स्वारी त्याजवरी गेली होती; परंतु रेटले नाही. त्याचे कुमकेस गेले. ठाणे हाबसियापासून घ्यावयास गेले असेत. चिमाजी भिवराऊ फौज घेऊन जांबगावाकडे गेले होते ते आले. त्याजबा फौज व रामचंद्र हरि पहिलेच पुढे पाठविले. हाली आपणहि गेले. माहादाजी अंबाजीहि बरोबर गेले असेत. १ बाळाजी बाजीराऊ सातारा आसेत.

---

*No. 321*] [*19-4-1736*

राघो लक्षमण पुरधरे याची कन्या जनोबा राजउपाध्ये याच्या मुलास दिल्ही. लग्न वद्ये ५ सोमवारी जाले असे.

---

*No. 322*] [*22-4-1736*

वैशाख वद्ये ८ गुरुवारी कोकणातून वर्तमान आले की वद्ये ५ सोमवारी वेसियापासी सिदीसाताचे व चिमाजीआपा व मानाजी आंगरे याचे जुंझ जाले.

हबसियाचा मोड जाला. याची फते जाली. हबसियाने रेवसे पाडून आतील दाणादुणा गलबतात घालून नेला. यांची फौज आली. इचा मोहला घ्यावयास हजारा माणसानसी राहिला होता. त्याजला चिमाजीआपाची खबर नव्हती. आंगीरियाची व हशमेचीच होती. लडाई जाली. याची फते जाली. आंगरी-यानेहि बरी कस्त केली. सिदीसात खासा पडिला. कोंडनाक माहारहि पडला. घाटगा सरदार होता तोहि पडला. सा सातसे माणूस कापून टाकले. गलबते पलोन गेली. पेसवियाकडील दाहा बारा घोडे पडले. दाहा पाच माणूस जखमी जाले. जिवाजी सितोला न्हावकर पडिला, असे वर्तमान आले असे. १

कुंवर बाहादूर सिनरचा देसमूख अपमरणे मृत्ये पावला. खबर दाहा रोजाची आलीकडे अगर पलीकडे असे. १

---

*No. 323]* *[24-4-1736*

वैशाख वद्य १० मंदवारी जानो शंकर खासनीस राजआज्ञेचे मुतालीक यास देवआज्ञा जाली. जेस्ट स्त्रीने अग्नप्रवेस केला असे. १

याचे पद देवराऊ लपाटे म्हणून बाा आहे त्यास सांगितले असे.

---

*No. 324]* *[26-4-1736*

वैशाख वद्य १२ सोमवारी राघो विनायेक याचे लग्न इंदुरीस जाले. वासदेव अनाजी देसपांडे चाकणकर यांची नात केली असे.

सोमवारी कान्होजी भोसले सातारियाहून पलोन गेले. दोन तीनसे राऊत होते. कृष्णेस स्नानास जातो म्हणून राजश्रीस पुसोन गेले, तैसेच निघोन गेले असेत. १

---

*No. 325]* *[11-5-1736*

अधिक सुध १२ मंगलवारी वर्तमान आले की बापूजी भीमशेन पारसनीस राजश्री रावापासी होते त्यास लस्करात वेथा जाली, मृत्ये पावले, यैसे वर्तमान आले असे. १

---

*No. 326]* *[16-5-1736*

अधिक वद्य ३ राजश्री बालाजी बाजीराऊ सातारियाहून आले पुणियास. १

राजश्री संभाजीराजे याजला आणावयास राजश्री स्वामीनी फतेसिंगबावा व बालाजी बाजीराऊ व श्रीपतराऊ व नारबा पाठविले ते कोल्हापुरास जाऊन संभाजी राजियास घेऊन आले. हे राजे पालीपावतो सामोरे गेले होते. सातारियास आलियावरी त्याजला पेसवियाच्या वाडियात जागा दिल्ही. राहिले असेत. १

---

*No. 327]* *[21-5-1736*

अधिक वद्ये ८ आस्टमी सुक्रवारी राजश्री चिमाजीआपा कोकणांत गेले होते. सिदीसात मारला. ते स्वारीहून पुणियास आले. लस्कर अंवंधावर ठेविले. बाईस सामोरे जाणार. १

---

*No. 328]* *[19-5-1736*

अधिक वद्ये ६ बुधवारी मध्येरात्री आपाजी माणकेस्वर सुपेकर देसपांडे यास आंबीमधे देवआज्ञा जाली असे. १

---

*No. 329]* *[26-5-1736*

चिमाजीआपा मातुश्रीस सामोरे अधिक वद्ये १२ सोमवारी गेले असेत, पाबळापावेतो. १

---

*No. 330]* *[23-5-1736*

**श्री**

करिने श्रीसके १६५८ नलनाम संवछरे अधिक वधे नवमी रविवारी मृग नक्षत्र निघाले. अव्वल साल सन हजार ११४६ मुहुर सन सबा सलासीन मयां अलफ.

जेस्ठ सुध ३ त्रितीया सोमवारी मातुश्री राधाबाई राजश्री पंतप्रधान यांची माता माहायात्रेहून पुणियांस आली. देशमुख देसपांडिये कळसावर सामोरे गेले. येक मोहर नजर बाईस केली असे. दुसरे रोजीं माउंदे केले. सगट रुपया ब्राम्हणास दक्षणा दिल्हे असे. १

---

*No. 331]* *[15-6-1736*

जेस्ठ वद्ये ३ नरमदातीरीहून पेसवियाकडून वर्तमान आले की, मजल दरमजल येतो. होलकर व सिंदे याजकडून मालवियात छावणी करविली. आनंदराऊ पवार अपमरणे मृत्ये पावला. विसा तारखेची खबर आहे. १

2581

No. 332] [10-6-1736

जेस्ठ सुध माहादजी अंबाजी पुणियाहून सासवडीस गेले. बरे वाटेनासे जाले असे १.

जेस्ठ सुध १३।१४ चिमाजीआपास बरे वाटेनासे जाले. द्रुस्टदान व म्हैसीदानें व अनुष्टाने केली असेत. बरे जाले. भ्रमहि पडिला होता. १

---

No. 333] [23-6-1736

जेस्ठ वद्य ११ बुधवारी राजश्री पंत सचिव नारो शंकर यांस भोरचे मुकामीं देवआज्ञा जाली असे. १.

पेसवियानी हतीचा रथ आणिला असे.

[24-6-1736

जेस्ठ वद्य १२ गुरुवारी राजश्री बाजीराऊ पंडित प्रधान स्वारीहून पुणियास आले. बालाजी बाजीराऊ संगमपर्यंत सामोरे गेले होते. १

---

No. 334] [28-7-1736

श्रावण सुध प्रतिपदेपासून ब्राम्हणभोजन राजश्री पंतप्रधान याणीं केले. नागपचमी जाली ते दीस दक्षणा दिल्ही येकापासून दोनपावेतों; ब्राम्हण च्यार पांच हजार जमा जाले होते. १.

---

No. 335] [31-8-1736

भाद्रपद सुध ७ मंगलवारी राजश्री पंत सातारियास राजश्रीचे भेटीस गेले. सिवापूरकरास वेटे मागितलें होते; त्याणी दिल्हे नाहीत; म्हणून हटविले असेत. १.

---

No. 336] [15-9-1736

भाद्रपद वद्य ६ सह सप्तमी बुधवार कपिलाशष्टीचा योग आला. आवघे योग होते; परंतु मंगलवारी नव्हता, म्हणून पहाटे चौ घटका रात्री परवकाळ होता कपिलाशष्ट केली असे. १

राजश्री पंताचेथे अनुस्टान जाले. होम जाला. कुडमंडप केला होता. [पुढें कोरी जागा.]

2582

*No. 337*] [*4-10-1736*

आश्विन सुध येकादसीस मिया (?) खान यास देवआज्ञा जाली [पुढें कोरी जागा]

---

*No. 338*] [*10-10-1736*

आस्विन वद्य १ रविवारी राजश्री राऊ प्रधान सातारियाहून जेजुरी मोरगाऊ कुरकुंब करून पाटसावरून पुणियास आले असेत. १

---

*No. 339*] [*26-10-1736*

कार्तिक सुध पचमी मंगलवारी राजश्री राऊ उतरपंथे स्वारीस जावयास भांब्रोडियावर जाऊन राहिले असेत पाहटे. बराबर नाना पुत्र यास नेले असे १

राजश्री पेसवियानी गायेउतारी नवे सिवालये करविले. राजश्री सिवरामभट चित्रांव यास काम घ्यावयास सांगितले असे. त्याचा मुहूर्त केला. [कोरी जागा]

---

*No. 340*] [*24-10-1736*

कार्तिक सुध २ द्वितीयेस रविवारी उधोबा गोसांवी अबंले देहूकर यास देवआज्ञा जाली असे. १

---

*No. 341*] [*12-11-1736*

कार्तिक वद्य ९ सुक्रवारी पेसवे कूच करून मजल दरमजल गेले. पंताजी मोरेस्वर सिवणेकर यास कुहीज प्रांतीचा सुभा पेसवियानी सांगितला असे. वासुदेव जोसी याचा कल्याणचा सुभा दूर करून बरवाजी ताकपीर पाठविला असे. [कोरी जागा]

संभाजी आंगरे कुलाबियावरी येणार. याजकरिता मानाजी आंगरे यांस पेसवियानी लोक कुमकेस पाठविले असेत. १

अंताबा नाईक भिडे याणीं मोहियाबाद ऊर्फ बुधवार पेठेस आपला कमाविसदार रामाजीपंत सालमजकुरी पाठविला असे. १.

हरिपंत दूर केला असे. १.

बापूजी मेघश्याम ढेरे याणीं जुनी सनद फुलगाऊ आद चावर व जोरगांव आद चावर इनाम याची काहडली; परंतु भोगवटा नाही. हाली पेसवियानी इनाम करार केले असे. १.

No. 342] [17-11-1736

कार्तिक वद्ये ११ गुरुवारी राजश्री चिमाजीआपा आळंदीस यात्रेस गेले. बुधवारी पुणियास आले. येकादसीसच बाजी शंकर देसपांडे याची बायको श्री काका देव याची कन्या ईस देवआज्ञा जाली. चौ घटिका रात्रीस. १.

कार्तिक मासी रंभाजी निंबालकर यास देवआज्ञा जाली. तिथीची तहकीकात करावी.

---

No. 343] [December 1739

मार्गेस्वरमासी बाबूराऊ दाभाडा सवाई खांसखेल यांस देवआज्ञा झाली.

मार्गेस्वरमासी दाजीपंत सिहगडांस सचिवाकडून आले. बराबर मुतालकीचे सिके आहेत. राघो वेंकटेस व रंगो रघुनाथ व गोमाजी दतो वगैरे आहेत.

---

No. 344] [4-1-1737

पौश सुध १४ राजश्री चिमाजीआपा जेजुरीस पुढे यात्रेस गेले. तलियाचे काम पाहून कुरकुंब करून यात्रयास गेले. तिकडे नालबंदाचा बोभाट आला. त्याजला लुटले. अलेगांवी मुा केला. तेथून मुकाम करीत न्हावीस आले. तेथे काहीयेक दिवस मुकाम केला. तेथून पुणियास फालगुण सुध ७ शनवारी आले.

---

No. 345] [January 1737

पौशमासी वद्येपक्षी त्रिंबक कृष्ण राजरुसी सुभेदार किले पुरंधर याणीं आपला देसमुखाच्या वाडियावरता वाडा आहे, त्याजला आवर घालावयास काम लाविले असे.

शके १६५८ पौष

आनंदराऊ पवार याचा लेक येसवंतराऊ पवार याचा वाडा ठाकूरठिकियात बांधिला असे. १.

पेसवियानी इनामकी पाटिलाची, तेथे विहीर करून बाग केला असे. त्यात पानवेली लाविल्या असेत. १.

गोपालराम याजला लालमहालचे जमिनीपैकी त्याच्या वाडियामागे जागा होती ते दिल्ही. त्या जागियावरी गोपाळपंती वाडा बांधला. खंडभटाच्या भिंतीपासी सात हात गली पंती टाकविली असे. १.

---

१ चौकसी.

2584

अंताजी हरि हवालदार निरथडीकर हे फलटणांस राजसबाईच्या मुलीच्या लग्नास राजश्री आले होते त्याच्या साहित्यास गेले होते. तेथे वेथा जाली. घरी परिंचियास येऊन वारले. त्याची ती जा [कोरी जागा] त्याचा हवाला त्याच्या मुलाच्या नांवे दिल्हा. १.

---

*No. 346]* *[26-2-1737*

फालगुण सुध ७ मंदवारी राजश्री चिमाजीआपा पुणियास आले असेत. १.

फालगुण सुध पूर्णमा मंदवारी होलीचे दिवसी ग्रहण पडले असे. १.

---

*No. 347]* *[7-3-1737*

फालगुण वद्य २ सोमवारी आपाचे दुसरे बायेकोचे फलसोभन जाले. आहेर जाले. देसमुखानी आहेर केला. देसपांडे सामील जाले नाहीत. लबाडी करून निराला आहेर केला असे. आपास सांगितले की पहिली चाल येकेठाई करावयाची. देसपाडिये छेद करितात. त्याणी ताकीद करावी यैसे केले असे. १.

---

*No. 348]* *[25-2-1737*

फालगुण सुध ५ । ६ सुक्रवारी येशवंतराऊ वीरेस्वर श्रीदेव चिंचवड यांजकडे होते ते होलकराकडे आलीकडे राहिले होते. ते पुणियातच वारले असेत. १.

चैत्र सुध रुजू फालगुण वद्य रा चिमणाजी भिउराऊ व रामचंद्र हरि व संकराजी केशव वगैरे लोक फिरंगणाकडील हवे आली याजकरिता वसईस व साष्टयाकडे पाठविले असेत. मागून आपण जाणार.

---

*No. 349]* *[21-3-1737*

यादी करिना सके १६५९ पिंगलनाम संवछरे चैत्र सुध १ सोमवार गुढ्याचा पाडवा सन हजार ११४६

सुध २ मंगलवारी राजश्री चिमाजीआपा परस्छाने बागांत गेले.

तेथून गुरुवारी रात्री फिरंगणाकडे स्वारीस गेले आसेत. १.

2585

No. 350] [31-3-1737

सुध ११ गुरुवार राजश्री चिमाजीआपाकडून वर्तमान आले की शनवारी शष्टीस फिरंगियाचे ठाणे साष्टे फते केले असे. ठाणे घेतले. वसईस जाऊन बाहादूरपुरा घेतला. किला वसईचा भाडत आहे. सास्टींत यैवज थोडाबहुत सापडला. लोकास कांही घेऊ दिल्हे नाही. झाडे घेतले. [1]त्यावर महिनिया कां बेलापूर व मांडवी फिरंगियाची ठाणी घेतली.[1]

No. 351]

राजश्री पंतप्रधान यांजकडून वर्तमान आले कीं हटैर लुटली. भद्रावरच्या पेठा लुटल्या. हटैचा किला भांड(त) होता. मग राज्याने कौल घेतला, वीस लाख रुा दिल्हे. हटैरीस लूट फार सापडली.

No. 352] [8-4-1737

चैत्र वद्य ९ शुक्रवार मुंजीची लग्न.

चिमणाजी नारायेण याच्या भावाची सिंहगडी जाली. सचिवाच्या धाकट्या भावाची माहादाजी शंकर याच्या पुत्राची जाली असे.

१

गोपालराम देशपांडे याच्या चौथ्या लेकाची जाली.

१

त्रिंबक बापोजी देशपांडे याच्या पुत्राची जाली असे.

१

No. 353] [6-5-1737

छ ९ मोहरमी गंगेस पाणी आले. आस्त्रीर्ये (आश्चर्य?) जाले. पाऊस वरता थोडकासा पडिला होता.

No. 354] [5-5-1737

वैशाख वद्य २ संभाजी जाधव याचे लेकीचे लग्न वाघोलीस जाले. उदाजी पवार यांचे लेकासी सोयेरीक केली. १.

No. 355] [29-4-1737

वैशाख सुध ११ रघुनाथजी परभू याची घोडीचे[2] लग्न जाले. जिऊबा चिटणीस याच्या पुतण्यास दिल्ही. पुणियांत लग्न जाले.

---

१—१ हा मजकूर निराळ्या वळणाचा २ पुतणीचे.

No. 356] [2-7-1737

आशाढ वद्य १ शनवारी राजश्री चिमाजीआपा वसईस गेले होते ते पुणियास आले आसेत. १.

---

No. 357]

आशाढ वद्य ६ बुधवारी श्रीमंत राजश्री बाजीराऊ पंतप्रधान स्वारीस हस्तनापूरपावेतो गेले होते ते पुणियास आले असेत. १.

---

No. 358] [24-7-1737

श्रावण सुध ८ रविवारी राणोजी सिंदे व मल्हारजी होलकर पुणियास आले आसेत.

---

No. 359] [6-9-1737

भाद्रपद वद्य अस्टमी अगर नवमी रविवारी बाजी भिवराऊ याणी वसईस सिड्या लाविल्या. फिरंगी याणी मार केला. सिड्या लोटून दिल्या. याज-कडील माणसे च्यारपांचसे मेली. च्यारपांचसे जखमी जाली. खराबी जाली. बाजी भिवराऊ याच्या उजव्या हातास * फ त्या ल्या खिल्याची जखम लागली असे.

---

No. 360] [20-9-1737

आस्विन सुध ८ मंगलवारी रात्री पेसवियानी दादजी सितोले व जानोजी ढमढेरे या दोघांस दोन पालख्या दिल्ह्या असेत. १.

---

No. 361] [22-9-1737

आस्विन सुध १० गुरुवारी रा। पेसवियानी संताजी मोरे पागेचे सरदार, यास पालखी दिल्ही आसे; व नारो सिवदेव कोकणस्त ग्रहस्त मालवियांत कमावीस करीत होता त्यासहि पालखी दिल्ही आसे. १.

---

No. 362] [15-10-1737

कार्तिक सुध ३ शनवारी प्राथःकाली राजश्री बाजीराऊ पंतप्रधान मुलुकगिरीस जावयास मुहूर्ते रा। बाबूजी नाईक जोसी यांच्या घरास गेले; व डेरे भांबोडाच्या रानात रोहरापासी दिल्हे. बाबूजी नाइकांचे घरींहून दुसरे तिसरे रोजीं भांबो-डियापासी डेरे होते तेथे गेले.

No. 363] [22-11-1737

रा। बापोजीपंत नाना व जगनाथपंत व गोपालराम देशपांडे व त्यांचे भाऊबंद यैसे राजश्री पंतप्रधान याजबराबर गिरनईपावेतो गेले होते. तेथे देशपांडियाचा मजकूर पडिला होता परंतु कांही जाले नाही. ते अवघे माघारे गावास मार्गेस्वर सुध ११ मंगलवारी आले. निळो विठल रा। चिमाजीआपा बा। लस्करांत राहिले.

---

No. 364] [4-12-1737

मार्गेस्वर वद्ये ९ रविवार. या मागे सात आठ दिवस पाहाटेस व सांयकाली अवसी पाहाटे दिशा लाल होतात. च्यार घटकापर्येत लाल अभ्र असते. मागती निवलते दिशादाह होतो. दुछिन्न आहे.

भार्गवराम बावा याणी का।। पाटसचे विहिरीस बारवेस बांधावयास काम लाविले आहे; व पाटसच्या सिवारात देशमुखाचे तले रा। मालोजी नरसिंगराऊ यांचे आहे, त्यास राणोजी सिंदे याणी काम लाविले आहे. १

भार्गवराम बावानी येवताचे विहिरीस काम लाऊन गेले साली केली तयार तैसीच पाटसी करणार. १

---

No. 365] [26-12-1737

पौष वद्ये १ वर्तमान आले की अलजपूरचा सुभा सुज्यातखान याजला रघोजी भोसले याणी धरिले. फौज मारिली लुटली. खासा जखमी होऊन पाडाव जाला. हती घोडे अवघे घेतले असेत. १

रोज मजकूर वर्तमान आले की निजामाकडील येक मोगल माळवियात मल्हारजी होलकर याच्या ठाणियास वेढा घालून बैसला होता तो होलकराने बुडविला असे. १

---

No. 366] [27-12-1737

पौष वद्ये २ वर्तमान आले की नीळ परभूचा लेक चिटकोबा सरलस्करचे चिटनीस याजला लोणंद तडवल येथिल्या मुकामी समेत येक चाकर त्र्यंबकराऊ सोमवंसी सरलस्कर याणी जिवे मारिले. आपली राखहि मारिली आसे.

No. 367]

पौश वद्ये १ सुक्रवारी संक्रातीस वर्तमान आले की फिरंगियाणी माहीमच्या वेढियावर चालोन घेतले. जुंज जाले. माहादाजी केशव शंकराजी केशव याचे वडील भाऊ ठार जाले. रामचंद्र हरीस हातास गोली लागली. येक दोन ब्राह्मण मेले. सेणवईहि येक दोघे पडले. हशमातील सरदारहि दोघे तिघे पडिले. वगैरे दोन अडीचसे माणूस पडले असे. १

---

No. 368] [19-12-1737

छ ७ रमजानचे पत्र राजश्री पधानपंताचे पत्र आले की भुपालाचा आश्रये करून किलीजखान बसला आहे. आम्ही तिसरे रमजानी भुपालावर मोगल मुकामास आला ते समई गाठला. जुंज जाले. मोगल थंडा केला. मोगल किलियाचा आश्रा धरून राहिला. आम्ही बाणा दो बाणांच्या टपियाने भोवते राहिलो. दाणा पाणी मोगलास जाऊ देत नाही. मोगल सिकंदा केला आहे. लौकरीच घेऊ यैसी पत्रे आली असेत. १

---

No. 369] [30-12-1737

छ १८ रमजानची पत्रे पेसविंयांस अली की मोगलानें सिकंदा होऊन सल्यावर घातले. पुढे सवेच कागद आले की सला जाला. मालवा दरोबस्त दिल्हा. चमेलीपलीकडे जाऊ नये यैसे जाले असे. मोगलाने काही पैकाहि दिल्हा. नसरजंग बऱ्हाणपुरास नवाबाकडे जावयाच्या उद्यगास जात होता. त्यास वाटेस रा। चिमाजी आपाच्या लोकानी पछाडीवर घातले. नेमाजी सिंद्याच्या नातू याची दोनसे घोडी घेतली. व हाती तीन घेतले. सला जालासा खबर आलियावर वसईकडे गेले. सास्टीस राहिले. फिरंगियाने धारावीस ठाणे होते. त्याजवर घातले. ठाणे घेतले. पाचसातसे माणसे मेली.

---

No. 370] [1-2-1738

माघ वद्य ८ बुधवारी पाचा घटका रात्री देशमुखाची मूल भवानी इचे लग्न जाले. सटवोजी जाधव वाघोलीकर याच्या मुलास दिल्ही असे. १

---

No. 371] [9-2-1738

फाल्गुण सुध २ बाजी भिवराऊ याचे बायकोस देवआज्ञा जाली असे. १

श्री

करिने श्री सके १६६० कालयुक्तनाम संवछरे चैत्र सुध १ शुक्रवार सुाा समान सलासिन मया अलफ. सन ११४७

देशपांडियाच्या रामनवम्याचा मोहछाव निळोपंताच्या बायेकोच्या वाळितामुळे राहिल्या असेत १

---

*No. 372]* *[3-4-1738*

चैत्र वद्य ११ राा बापूजीपंत नाना येथे आले; बालोबास वसईकडे रवाना करावयास श्रीमंत राा चिमाजीपंत आपांकडे.

---

*No. 373]* *[11-4-1738*

वैशाख सुध ३ मंगलवार अक्षत्रितीया निळो विठल देसपांडे सातारियाहून राजपत्रे घेऊन आले कीं स्त्रीचे वाळित पडिले आहे त्याची सुधता करावी. त्याजवर सई निळोबाची बायेका इजला त्रिषप्रळये जाला. बुधवारीचे रात्री तिसरे प्रहरी वारिली. गाडियावरी घालून नदीस नेऊन दहन केले; सकाल दिवस उगवता गुरुवार लागला असे. १

---

*No. 374]* *[21-4-1738*

वैशाख सुध १३ शुक्रवार नरसिंहजैंतीचा उपास; ते दिवसी प्राथःकालच्या सा सात घटिका दिवसा आकस्मात् आकाशध्वनीचा शब्द जाला. जसा भांड्यांचा[1] आवाज होतो याप्रमाणे कढाडिले असे. गाडियाच्या गडिगडीसारिखे वाजत गेले. आकासीतून दिवसा जे समई आवाज जाला, ते समई नक्षत्र थोर पडिले. दुचिन्न जाले असे. १

---

*No. 375]* *[27-4-1738*

वैशाख वद्ये ९ गुरुवारी दारूवालियाची घरे पिराच्या चिंचाजवल होती. त्याच्या घरात दारूचा सरकारचा कारखाना होता. दारू तयार होत होती तो दलता जातियाची ठिणगी पडिली. दारू उडाली. पकी दीड दोन मण होती. मजूर दारूच्या कामावर होते ते दारूने जलाले. तीन घरात जलाली. बारा बाहेर जलता जलता पलोन गेली. अंगाचे भाते निघाले. सेवटी मेली. दोघे तिंघे मात्र वाचिली. वरकड अवघी येका दो दिवसानी मेली. आगीने दोन तीन घरे जलाली. मजुरे जलाली. गरिबे. फटकाल गोष्टी जाली असे. १

---

१ तोफेचा.

No. 376] [1-5-1738

वैशाख वद्ये ९ सोमवारी वसईहून चिमाजीआपापासून माहादोबा पुरंधरे राजश्रीकडे जावयास आले, तो राजश्रीच्या लस्करांतून दादोबा पुरंधरे यांची पत्रे आली की, उदाजी चव्हाण यास आणावयास फतेसिंगबावा व श्रीपतराव व संभुसिंग तासगावांस पाठविले. तो कोसावर पुढे सामोरा येऊन यांस भेटला. याणीं हाती धरून बिबवीच्या मुकामावर राजश्रीच्या दर्शनास आणिलें. दर्शन जाले. सवेच निरोप दिल्हा की, उदईक मागती या. तुमचे मुदे मनास आणून आज्ञा करणें ते करू. ऐसी पत्रे आली. चव्हाण राजश्री स्वामीस भेटला असे. दोनच्यार (दिवस) राजश्रीपासी होता. राजश्री ठाणीं मागो लागले याज-करिता फिरोन उठोन तासगावांस गेला. राजश्रीनी इमान देऊन आणिला होता म्हणून सुखरूप लोक देऊन तासगावांस पाऊन दिल्हा असे. त्याची ठाणीं घेतील यैसे असे १.

---

No. 377] [23-5-1738

जेस्ठ वद्ये १ मंगलवारी लग्ने जाली असेत.

१ गोविंदराऊ बिन बाबूराऊ उर्फ अडबोजी ना॥ देसमुख याचे लग्न खानवटे ता॥ पाटस येथे जाले. पुणांतून लग्न गेले असे. खानवटेकर त्रिंबकजी भों॥ याची लेक केली.

१ मल्हारजी बिन मानाजी सितोले देसमुख याची मुली कडेगावकर यादव यास दिल्ही असें. पुणियांत लग्न जाले.

१ बाजी भिवराऊ दि॥ रा॥ पंतप्रधान याचे दुसरे लग्न पुणियात जाले. परांडे येथील नाइकासी सोयेरीक केली. नवरी अकरा बारा वरसाची मिलाली असे.

---

No. 378] [18-6-1738

आशाढ सुध त्रयोदसी रविवासर तिसरे प्रहरा नढगेमोडीस सिवालय बांधले आहे, त्यामधे बाणांची स्थापना केली. बाण थोर उतम लक्षणयुक्त नरमदेहून ब्राह्मणाने आणिला होता. त्यास पाच सातसे रुो दिल्हे होते. साळोखा पार्थीव लिंगासारिखी तांबड्या पाश्याणांची नवी करून लिंगस्थापना केली. सदरहू शिवालये व आवघा खर्चवेच पेसवियानी केला; परंतु वेदमूर्ती सिवरामभट चित्राव याजकडून कामाकाजाचे पारपत्ये करविले. आवघी काम करावयाची व घ्यावयाची

उजकरणी वेदमूर्तीनी केली असे. गोविंद्‌भट बरवे बापूभटाचे पुत्र, याणी मागे फटकाल कर्म केले होते; त्याजवर ब्राह्मणानी शब्द आणिला. समत केले. त्याजवर मातुश्री राधाबाई पेसवियांचे आज्ञेवरून ग्रामस्तानी समत घातले नाही. प्रभूची आज्ञा पाहिजे म्हणून अनमान केला. कोकणस्थानी ग्रामस्ताचा द्वेश मांडिला आहे.

---

*No. 379*] [*24-6-1738*

आशाढ वद्ये ५ मंदवारी गांवची शांत केली. त्यास माहारामांगाचे पेढियाच्या घागरीबदल भांडण जाले. माहारानी तकरीर दिल्ही की पेढियाची घागर आमची; आपण दोन च्यार वेळा डोईवर घेतली होती. मांगानी तैसीच तकरीर दिल्ही. त्याजवर माहारानी सुतार डोरला जामीन दिल्हा. मांगानी बरवा परीट जामीन दिल्हा. पहिले दिवसी माहारानी जामीन दिल्हा नव्हता म्हणून रातचेरात कोटात बैसविले होते. दुसरे रोजी जामीन दिल्हा. पाटील सेटे माली पेठ शाहापूर याजला वर्तमान पुसिले. त्याणी कतबा लेहून दिल्हा की, मांगाचीच पेढियाची घागर आहे. खलियास रासीपासी पेढा मागच आणीत असतो. माहारानी येकदा डोबई करून पेढियाची घागर घेतली होती. मागे मांगच घेत आले. आलीकडे जरीचे साली सांत केली, ते समई मांगानीच घागर चालविली यैसी साक्ष दिल्ही. त्याप्रो बलुतियानी साक्ष दिल्ही. त्याजवरून मांगाचे डोईवर पेढियाची घागर देऊन गावाभोवता टोणगा फिरविला. सात केली असे. पेठांपेठांनी सांतीच्या खर्चाची पटी घेतली असे. सदरहू तकरीरा केसो संभदेव मोकासी याजपासी आहेत. दस्तके करून घेतली आहेत. राजश्री चिमाजी आपाच्या कानावर सदरहू वर्तमान घालून सदरहूप्रा सांत केली असे; हजीर:

जमीदार:

१ जगोबा
१ यादोपंत
१ गोपालराम
१ तात्या
१ खंडो विसाजी
१ गुंडोपंत
६ वगैरे.

गावकरी:

१ वाकोजी पा चांदजी पा कान्होजी पा लब्या व चौ
१ बाबू सेब्या व गंगाजी शेब्या व पांडू माहाजन.
१ दाद माली सुभान माली सोमाजी पारखी वगैरे माली व गोपाळ मोरेस्वर कुलकर्णी

2500

बलुते:

१ संतू डोरला सुतार

१ बांभोडकर

१ धोंडी लोहार

१ वाल्ह कुंभार

१ बरवा परीट

१ पांडुरंग जोसी

१ संतू मगर

१ अनसू अढाऊ

१ मल्हारपंत राजरूष कुलकर्णी निा मुंजेरी.

१ रामसेट पेठ शाहापूर

१ सेकोजी पाा.

येणेप्रां हाजीर होते. याजदेखता केसोपंताचेथे सदरहू करीना जाला असे. १

---

No. 380] [15-7-1738

श्रावण सुध दसमी मदवारी राजश्री पंतप्रधान घरास आले. काल संगमावर होते. आजी वाडियात आले सामोरे चिमाजी आपा व नाना वगैरे सेखपासिया (?) पावेतो गेले होते.

राजश्री स्वामीच्या लस्करातून खबर आली की संभाजी माहाराजांची पेसवाई भगवंतराऊ पिंगले यास सांगितली असे. नील प्रभूची काढून, पिंगलियाची पिंगलियांस दिल्ही असे. राजश्रीनी दमाजी थोरात याचा धाकटा लेक चंद्रभान याजला राजश्रीनी येसमाली याबाा पागा दिल्ही. सरदारी याजकडे. कारभार येसमालियाकडे. यैसे केले असे.

गोविंद कृष्ण जुनरचे सुभेदार वारले. त्याचा धंदा त्याच्या लेकास राजश्री पेसवियानी सांगितला असे. १

---

No. 381] [4-8-1738

श्रावण वद्य ३० शुक्रवारी सायेंकालीच्या तीन घटका दिवसां सूर्यग्रहण पडिले. माहापर्व होते. १

---

No. 382] [16-8-1738

भाद्रपद सुध १३ बुधवारी राजश्री बाजीराऊ पंतप्रधान राजश्रीच्या भेटीस जावयास प्रस्थाने निघाले. ते आवजी कवडियाचे घरी राहिले. प्रतिपदेस स्वार होऊन कुरकुंबास गेले. तेथून मोरगांवास गेले. अंबीस सप्तमीचा पक्ष

करून, जेजुरीहून पलीकडे राजश्रीच्या दर्शणास गेले. जेजुरीस राणोजी खोमणा याजपासून घोडी मागून घेतली असे. जेजुरीपावेतो रा। बापूजीपंत नाना गेले होते.

---

*No. 383*] [*17-8-1738*

भाद्रपद सुध १४ गुरुवारी निळो विठल देशपांडे याचे स्त्रीचे वाळीत पडिले होते. त्याचे प्राश्चितविधास प्रारंभ केला. क्षौरे केली. सईचे व शंकराजी विठलाचे व केसो गोविंद याच्या सुनेची, तिहीचेहि अवघियानी तीन दिवस सुतक धरिले. दशा करून अकरावा बारावा दिवस केला. तेरावे दिवसी मासमी केली असेत. दोन द्वादस अब्धे निलोबास प्रायेछित सागितले. येक दोड द्वादस अब्ध भावाबंदास सागितले. तीन्हीहि निलोबानीच कबूल केली. बारासे साठी रुो निलोबानेच कबूल केले. भावाबंदापासून पैका घेतलियाने जन्मेवर ठोसरा, याजकरिता आवघे निलोबानेच मान्ये केले असे. निळोबास भावाबंदानी घालवावयास आळस केला नाही; परंतु त्याचे त्यानेच राजद्वारीहूनहि उलगडा करून आणिला, येथीलहि केला असे. आधिक सुध दसमीस भावाबंदाकडून मागती आठरा अब्दाचा संकल्प करविला. यैवज निलोबानेच दिल्हा. आधिक वद्य १ ब्राह्मणभोजन केले असे. काही नदीस, काही घरी जाले असे.

---

*No. 384*] [*29-8-1738*

भाद्रपद वद्य ११ मंगलवारी राजश्री चिमाजीआपा कुरकुंबास श्रीच्या दर्शणास स्वार होऊन गेले, ते पाटसावरून कुरकुंबास गेले. तेथून जेजुरीहून सासवडावरून दाहावे दिवसी पुणियास आले असेत. १

---

*No. 385*] [*22-10-1738*

आस्विन वद्य ६ रविवारीं वर्तमान आले कीं, तासगांव श्रीमंत राजश्री पंतप्रधान यानीं घेतले.

आथणीचे ठाणे जैतजी चव्हाण याचे होते ते ठाणे राजश्री श्रीपतराऊ याणी घेतले; वर्तमान आले आहे.

कार्तिक वद्य ४॥५ विठल सिवदेऊ चिखलीकर यास देवआज्ञा जाली म्हणून खबर आली.

No. 386] [20-11-1738

कार्तिक वद्य ५ सोमवारी राजश्री चिमाजीआपा मुहुर्तेंकरून बाहेर निघाले. ते भांबोडाच्या रानात डेरे देऊन राहिले असेत. ते कार्तिक वद्य ११ रविवारी आलंदीस गेले असेत. १

---

No. 387] [26-11-1738

कार्तिक वद्य ११ रविवारी पाहाटेस रा आयाबाचे पुत्र चिटकोबा यास देवआज्ञा जाली असे.

---

No. 388] [18-12-1738

मार्गेस्वर वद्य ४ सोमवारी रा राऊ प्रधान राजश्रीकडून पुणियास ती प्रहरा रात्री आले. राजश्रीस काही पैका देऊन रा नानास पाचाश्या राउतानसी ठेऊन आले असेत. १

आवजी कवडे याणी कुकुडमुंढे घेतले म्हणून खबर आली असे. १

---

No. 389] [12-1-1739

पौश सुध १४ शुक्रवारी खबर आली की राजश्री चिमाजीआपा याणी माहीम घेतले. फते जाली. वरकडहि ठाणी घेणार. केळवेहि घेतले. तारापूर घेतले. बाजी भिवराऊ ठार पडिले. सुरुंग लाऊन बुरूज उडविले आणि हला करून ठाणें घेतले असे; व चिंचणीहि घेतली. व अशेर किलाहि घेतला. १

सुा तिसा सलासीन मया अलफ. सके १६६०
कालयुक्त नाम संवछरे. सन ११४८
करिने.

राजश्री चिमाजीआपानी राजश्री बापूजीपंतनानास वस्त्रे [ कोरी जागा ] दिल्ही ते समई जमिदारासहि दिल्ही गुा कल्याणराऊ बाजी कान्हो, खंडो विसाजी व दामाजी गोपाल. वस्त्रे बिताा

४ देसमुख दोघे द आा तिवट पासोडी यौ
२ तिवटे.
२ पासोड्या किाा रुा ३० वरात बालाजी दादाजी.
४
३ देसपांडे तिघे दर आा तिवट १
यौ तिवटे.
७

*No. 390]* *[28-1-1739*

पौश वद्य अमवाशेस राजश्री चिमाजीआपाची पत्रे रायास आली की, तारापूर घेतले, फते जाली. परतु बाजी भिवराऊ यास गोली लागली; ठार जाले. पाचवे रोजी येथे कलले असे रविवारी.

---

*No. 391]* *[3-2-1739*

माघ सुध शेष्टी सुक्रवारी सात घटका रात्री उरली ते समई राजश्री पंतप्रधान मुहूर्तेकरून नदीपलीकडे बिबी सैदानीवरते डेरियात जाऊन राहिले. दिवस उगऊन शेष्टी सुक्रवार लागला. आधले दिवसी डेरे दिल्हे होते. तेथून सुध ९ मंगलवारी कूच करून आलंदीस इंद्रायेणीवर गेले.

माघ सुध शेष्टी दादोबा पुरंधरे आले. नागोबाचे देवली राहिले असेत. १

---

*No. 392]* *[4-2-1739*

माघ सुध ७ सह ८ रविवारी खबर आली की, राजश्री चिमाजीआपानी अशेर किला फिरंगियाचा घेतला. किलेदाराची माणसें तारापुरात सांपडली होती त्यामुले त्याणीं किला दिल्हा असे. त्यापुढे धारावीहि घेतली असे.

---

*No. 393]* *[29-3-1739*

**श्री**

श्री सके १६६१ सिधार्थी नाम संवछरे चैत्र सुध १ गुरुवासर सुहुर सन तिसा सलासीन मया अलफ सन हजार ११४८ छ २९ जिल्हेज करीना स्मरणार्थ

रोज मजकुरी राघो चिंतामण चांदवडकर यास देवआज्ञा जाली. १
चैत्र सुध २ सुक्रवार.

---

*No. 394]* *[11-3-1739*

इरानची चढाई दिलीच्या पातशाहावर जाली यामुले महमदशा पातशा व किलीजखान व कमरदी व सादतखान वगैरे उमराऊ, साठी सतरी कोसावर चालोन गेले. त्यावर फालगुण मासी शुध पक्षी यांची त्याची लढाई जाली. सादतखान धरले गेले. खानडवरा मारले गेले, वगैरे अमीर मारले गेले.

त्याजवर किलीजखानानी सलुखावर घालून महमदशाहा पातशाहाची व ताहमस कुलीची भेटी केल्या. त्यावर येका दों दिवसा फालगुण सुध १४ रविवारी महमदशा पातशाहा चकते यांस ताहमसकुलीनें धरिले; व किलीजखान व कमरदीखान व गाजुदीखान वगैरे उमराव धरिले. कैदेत ठेविले असे. याच्या सविस्तर वर्तमानाची पत्रे रा बाबूराऊ मल्हार यांचे आले आहे त्यात लिा असे. १

नासकीहून वर्तमान आले की, कातनये किलाहून इसाजी बलकवडा नासकावर मखबूल अलमाचे पागेवर धाऊन आला. रात्री छापा घातला तो कोटातील लोक जागे जाले. त्यांचे यांचे युध्य जाले. तेथे येसाजी बलकवडा पडिला व आणिकहि दाहा वीस माणूस पडिले. राहिले लोक पलोन गेले.

---

*No. 395]* *[2-5-1739*

वैशाख सुध ५ मंगळवारी बाळूबाई येजुरवेदी विध्वा बायेको अउंधात राहाती. तिने पुणियात येऊन दोघे चौघे माणसे मजुरकरी करून व येक पायाळू मेळऊन पासणे बाणेरे याचे सिवेस रामनईचे पस्चमेस घोडदऱ्याचे सरदेस पासणाची वाट बाणेऱ्यास जाती तिचे पस्चमेस मोठी सील होती; तिजवर गणेश्याची मूर्त होती तेथे ठेवणे आहे म्हणून माणसे खाणावयास घेऊन गेली. हे वर्तमान सरकारचा कुरण्या सुलताना म्हणून येक होता, राजश्री पंतप्रधान याच्या सरकारचा त्यास कलले. तोहि तिजबराबर गेला. त्याणी रात्री तेथे खांटले सिळेवरील माती मात्र काहाडली. सीळ निघाली नाही. हे वर्तमान येथे राजश्री आंताजीपंत फडणीस व रा जिवाजी गणेश यास कलले. त्याणी दुसरे दिवसी सुध शष्टीस बुधवारी सायेंकाली पंचवीस तीस माणसे पाठविली. त्याणी रात्री खाटले. सीळ येकीकडे काहाडून तो आंत येक रांजण तांबडा खापराचा मादणीवजा फुटका निघाला. आत माती व दगड लाहाण लाहाण निघाले आणिक काही निघाले. वैशाख सुध सप्तमी गुरुवारचे दोनप्रहर दिवसपावेतो माणसे तेथे होती. मग आली. मजूरकरी माणसे बायेकोने नेली होतीं त्यास आणून अंताजीपंत जिवाजीपंत याणी मार दिल्हा. कैदेंत ठेविली. सुलताना म्हणून कुरण्या बाा होता. त्यासहि मारिले. कैदेत ठेविला असे. १

सदरहू जणापासून गुन्हेगारी घेतली असे दोन अडीचसे रुपयेपावेतो.

---

*No. 396]* *[7-5-1739*

वैशाख सुध १० सोमवारी वसईहून राजश्री चिमाजीआपांची पत्रे आलीं की वसईस मोरचे लाविले होते. सुरुंग लाविले होते. धमधमे रचले होते.

मंगळवारी सिधता केली. बुधवारी सुरुंग उडविले. बुधवारी व गुरुवारीहि येक दोन उडविले. दोन बुरुज व दों जागा कुसू उडाले, त्यामुळे आपल्याकडील माणसे काही दडपाने मेली; व काही उडाली. फिरंग्यासी युद्ध बरे जाले. त्याणीहि शर्त केली; व आमच्या लोकानीहि शर्त केली. बुरुज दोन घेतले. तेथे मोर्चे काइम केले. फिरंग्यानी कुसाआत मेढा घातला होता, तो बळकाविला आहे. सा रोजांची मुदत केली. सा रोजात किला खाली करून द्यावासा केला आहे. * * युधी लोक पडिले दताजी भांडवलकर * * * कर्जेकर पडिलें; व हंसू आढाव न्हावी पुणेकर छ ९ सफर गुरुवारी दुसरे हलेस पडिला. पहिली हला छ ४ सफर बुधवारची, दुसरी गुरुवारची; सखो गणेश सरनाईक पुरधरचे यास गोळा लागला, त्याणे त्यास देवआज्ञा जाली; व आणिकहि कितेक लोक पडिले, त्याची याद मागोन येईल त्याजवरून कळेल. दुरजनसिंग राजा मांडवीकर याचा जसोजी कारभारी होता तो पडिला, व रा। पंतप्रधान यांचा जमातदार कुवरसिंग होता तो पडिला. वैशाख वद्य ३ सोमवारीं खबर आली की वैशाख वद्य १ मंदवारी वसईत आपाचे ठाणे गेले. आपाहि गेले. फिरंगी निघोन गेले. वसई फते जाली. संवस्थानच प्राप्त जाले. राज्येच येक सुटले. फिरंगी स्थलापासून चेवले. ईस्वरे यास स्थल दिल्हे. मोठी फते जाली. याणीहि करोड रुा खर्च केला. फार येत्न केला; यैसा येत्न या राज्यात कोण्ही केला नाही.

---

*No. 397]* *[May 1739*

गराडियाची पाटीलकी राजश्री चिमाजीआपानी निमे दरोबस्त वडीलपण घेतले. गुमास्ता गावावर ठेविला. बालोजी बहिरजी जगदले हुजूर राजश्री स्वामीपासी फिर्याद गेले. त्याणी फिरोन मनास आणावेसे केले. तूर्त होलीची पोली अमानत केली. फाल्गुण सुध त्रितीयेस देवाची पोली देऊन होली जालिली. पेसवियाची पोली लागो दिल्ही नाही, येविशी राजश्री बापूजीपंत नानास राजश्रीचे व राजश्री बालाजी बाजीराऊ याचे पत्र आले. मग अमानत जाली असे. हुजरेहि आले होते. १.

---

*No. 398]* *[20-3-1739*

फिरंगियाचे उरूणचे ठाणे मानाजी आंगरे याणी घेतले असे.

फाल्गुण मासी वद्ये पक्षी दिलीकडून खबर आली कीं इरानची चाली दिलीवर जाली. त्याजवरी महमदशा पातशाह चालोन गेले. याचे त्याचे जुंझ्य जाले.

दिलीच्याचा मोड जाला. खानदवरा वगैरे ठार पडिले. सादतखान धरून नेला. मग सलियावरी घातले. पातशाह इरानियाचे भेटीस गेले. त्याणी पातशाह व निजाम व कमरुदी वगैरे कैद केले. पातशाही आपण घेतली. चाकतियाची पातशाही बुडाली. इरानियाची पातशाही जाली. पातशाह व अमीर धरिले गेले. इरानियाचे नाव पातशाहचे नाव नादरशा. दिवाणाचे नाव तोहमास कुलीखान यैसी सावकारी लिा आली. १.

---

*No. 399*] [*15-5-1739*

करिने सन ११४८

वैशाख वद्य ४ मंगळवारी श्रीदेव चिंचवड याचा नातू श्रीउमापतिबाबा यांचा पुत्र याचे लग्न खेडांत जाले. नरसिंगराऊ दामोदर याची मूल केली असे. १.

वैशाख वद्य १० ची पत्रे दिलीहून आली की, नारदशाहा इरानी दिलीस चालोन आला होता. त्याने दिलीमधे कतलअम[1] जालियावर खंडणी उमदे उमदे यांजपासून व सुजदानराव वकील याजपासून दोन लक्ष व धमोगंधराये वकील अबदुल नबीखान व उज्यागरचंद याजपासून दाहा हजार, सइदखान शामिरखानाचा वकील याजपासून पंचवीस हजार, रा केशवराव हरकारे यांजपासून पंधरा हजार रुा व बाबूराव खानदौराकडील याजपासून लाख रुा घेतले. * * * * पादशाही (न) सोडिले. छ ७ * * * * वारी किलियातून कूच करून * * * स छ ८ सफरी सोनपतेस आपले फौजेनसी गेला. जातेसमई छ ३ सफरी महमदशाहास तख्तावरी बैसऊन जवाहीर व कांहीं नगद व वस्त्रे व नबाबास समशेर व घोडा व खलयेत[2] येणेचप्रमाणे कुल अमीरास खलयेत देऊन सामाधान केले व च्यार फर्मान त्याचे मोहरनसी, येक नासरजंगास व येक नसिरुदौलास व राजे शाहू व बाजीराव याच्या नावे दिधली. व महमदशाहाचे फर्मान दक्षणेच्या कुल अमीरांस काही रवाना केले व कांहीं जातील. छ ८ सफरी शहरांत अजेचैन[3] जाले. कतलेमधे तीनच्यार लक्ष माणसे कतल जालीं. हजारो स्त्रिया, उमदे व साहुकार वगैरे बंदी धरून नेली. पंधरा मण जवाहीर व पनाससाठ करोड लुटीवेगला खंड घेतला. पाा * * ही हाती घोडे व उंटे व बैल व तमाम आमीरांचा माल येणेचप्राा घेऊन गेला. फकीर करून सोडिले. यैसा कहर दोन महिने दिलीवर जाला म्हणून पत्र आले. नादरशाहा इरानी आपल्या मुलकास अटकेपलीकडे गेला. महमदशाहा तख्तावर बसऊन गेला आसे. १

---

१ कतलाम, सर्रास कत्तल. २ खिलत, सन्मानाचा पोशाख. ३ कत्तल.